श्रीभगवान प्रासादिक वारकरी सांप्रदायिक ग्रंथमाला

पुष्प पहिले

# श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या समाधीचे अभंग



## संत नामदेव महाराज




गीर्वाणज्योति प्रकाशन

श्रीभगवान प्रासादिक वारकरी सांप्रदायिक ग्रंथमाला

पुष्प पहिले

# श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या समाधीचे अभंग

संत नामदेव महाराज




गीर्वाणज्योती प्रकाशन

सातारा पुणे मुंबई

१९४३शके] प्रथमावृत्ती [ २०२१ ईसवी

- **श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या समाधीचे अभंग**

  संत नामदेव महाराज

---


- **प्रथमावृत्ती** - कार्तिक कृष्ण ११, शके १९४३,

  आळंदी यात्रा ३० नोव्हेंबर, २०२१

- **प्रकाशिका** :

  सौ. सुमित्रा शि. जाधव

  गीर्वाणज्योती प्रकाशन,

  **भ्रमणध्वनी** - + ९१ ९८२२० ९७५०७

  **ईमेल** - geerwanjyotiprakashan@gmail.com

  **वेबसाईट** -

  **शाखा**:

  **१.सातारा** :

  गीर्वाणज्योती, कारंजकरनगर, पारशी विहिरीजवळ,

  विलासपूर, सातारा , महाराष्ट्र - ४१५ ००१

  **२.पुणे :**

  एच् १०३, भास्करा सोसायटी, डीएसके विश्व, धायरी,

  पोष्ट - नांदेड, पुणे, महाराष्ट्र - ४११ ०६८

  **३. मुंबई :**

  ४७, उदय को-ऑपरेटिव्ह हौसिंग सोसायटी, आरे रोड,

  अंबा माता मंदिरासमोर, गोरेगांव प.,

  मुंबई, महाराष्ट्र -- ४०० १०४

## संतसाहित्य प्रकाशन समिती

- **ह. भ. प. श्री. केदार कृष्णदास महाराज नामदास**,
  संत नामदेव महाराज यांचे १७ वे वंशज, श्रीक्षेत्र पंढरपूर
- **ह. भ. प. श्री. मुरारी मुकुंद महाराज नामदास,**
  संत नामदेव महाराज यांचे १७ वे वंशज, श्रीक्षेत्र पंढरपूर
- **ह. भ. प. श्री. पुष्कर रावसाहेब महाराज गोसावी,**
  संत एकनाथ महाराज यांचे १४ वे वंशज, नाथ संस्थान, श्रीक्षेत्र पैठण
- **ह. भ. प. श्री. मारुती महाराज निगडीकर**, सातारा

# विषयानुक्रमणिका

# श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या समाधीचे अभंग

## अभंग १ ला

ज्ञानदेव म्हणे विठ्ठलासी | समाधान तूंचि होसी |

परि समाधी हे तुजपासीं | घेईन देवा ||१||

न लगे मज भुक्ति |  न लगे मज मुक्ति |

तुझ्या चरणीं आर्ती | थोर आथी ||२||ध्रु.||

विठोजी म्हणे ज्ञानदेवा | ज्ञानसागरा अनुभवा |

वचनेंचि विसांवा | झाला मज ||३||

ऐकें ज्ञानचक्रवर्ती | तूं तंव ज्ञानाचीच मूर्ति |

परि पुससी जे आर्ती | ते कळली मज ||४||

येक येक अनुभव कृपा | पदपदांतरें केला सोपा |

तरी त्यांत माझी कृपा | सकळही वोळली ||५||

ज्ञानदेवें चरणीं मिठी | मनेसीं पडली येकी गांठीं |

दृश्यादृश्य झाली एकदृष्टी | प्रत्यक्ष भेटी विठ्ठलेंसी ||६||

कर ठेऊनी कुरवाळीं | सर्वांग न्याहार न्याहाळी |

म्हणे तुवां घेतली जे आळी | ते सिद्धीतें पावेल ||७||

नामा उभा असे सन्मुख | ऐकतां थोर खेद दुःख |

म्हणे ज्ञानांजन महासुख | समाधि घेतसे ||८||१||

## अभंग २ रा

ज्ञानदेव उभा जोडोनि हस्त | भक्त पाहाती समस्त |

विठोजी म्हणे कळला स्वार्थ | या ज्ञानांजनाचा ||१||

कैसें ओळलें त्या ज्ञाना | समाधान तया ध्याना |

मना नाठवें मीतूंपणा | समाधी खुणा ज्ञानासी ||२||ध्रु.||

मग म्हणे विठोजी दातार | समाधी तुज निरंतर |

आतां प्रस्थान करीं साचार | मज निरंतर आठवीं ||३||

कैसे परिपूर्ण वोळले | आपण समाधिरूप झाले |

मनातें मन समरसलें | विठ्ठलस्वरूपीं ||४||

दशमीं प्रस्थानाचा समयो | एकादशीं जागर उत्सावो |

द्वादशीं क्षीरापती महोत्सवो | ज्ञानदेवासी केला ||५||

त्रयोदशी म्हणे पांडुरंग | कांहीं न करीं गा उद्वेग |

अलंकापुरीं समाधी प्रसंग | करीं करीं लवलाह्या ||६||

माता रुक्मिणी वाढी ताटीं | विठोजी म्हणे उघडीं दृष्टी |

तुज मज आहे नित्य भेटी | येईं पंढरीये ||७||

नामा म्हणे ज्ञानउदयो | अलंकापुरीं सिद्ध समयो |

परी विठ्ठलीं मुराला भावो | या ज्ञानदेवाचा ||८||२||

## अभंग ३ रा

विठोजी म्हणे ज्ञानदेवा | तुम्ही विश्रांति मन ठेवा |
ते मुराली आमुचिया भावा | निःसंदेहे ||१||
कैसें समाधान ज्ञानदेवा | अलंकापुरीं समाधी ठेवा |
विठ्ठल ओळला वोल्हावा | नित्यरूप समाधी ||२||ध्रु.||
संत करिती महा खेद | म्हणती ज्ञानांजन उद्बोध |
मग चालिले विदग्द | अलंकापुरीसी ||३||
महावल्ली वृक्ष अजान | तो निक्षेपिला पूर्ण धन |
मग म्हणे विठोजी आपण | ज्ञानदेवासी ||४||
धन्य धन्य ज्ञानेश्वरा | पुण्यभूमि समाधिस्थिरा |
कृष्णपक्षीं तुज निर्धारा | भेटी देत जाईन ||५||
कार्तिक मासीं शुद्ध एकादशीं | पंढरी यात्रा होईल सरिसी |
दुसरी कृष्णपक्षीं निर्धारेंसी | तुज दिधली असे ||६||
हें ऐकोनी संतजनीं | जयजयकार केला ध्वनी |
दिंडीपताका मेळ गगनीं । देव सुमनें वर्षताती ॥७॥
नामा म्हणे आले वैष्णव | अलंकापुरीं मिळाले देव |
समाधी सुखें ज्ञानदेव | बैसते जाहले ||८||३||

## अभंग ४ था

महाउत्सव त्रयोदशी | केला तया ज्ञानदेवासी |

मग नामा म्हणे विठोबासी | चरण धरूनियां ||१||

समाधिसुख दिधलें देवा | ज्ञानांजन अलंकापुरी ठेवा |

अजानवृक्षीं बीज वोल्हावा | या ज्ञानांजनांसी ||२||धृ.||

कृपा आली विठ्ठलासी | म्हणे ज्ञानदेवा परियेसी |

तीर्थ भागीरथी अहर्निशीं | तुज नित्य स्नानासी दिधलीसे ||३||

इंद्रायणी दक्षिणवाहिनी | भागीरथी मणिकर्णिका दोन्ही |

इया मिळालिया त्रिसंगमी | पुण्यभूमीं तुझिये ||४||

येथें जरी नित्य स्नान घडे | तरी नित्य वैकुंठवास जोडे |

तुज नाहीं नाहीं रे कुवाडें | मी कोडें उभा असे ||५||

जेथें हरिकथा नाम वाचें | जो उच्चारील विठ्ठलाचें |

तयासी पेणें वैकुंठीचें | दिधलें साचें ति अक्षरीं ||६||

आणिक ऐकें रे ज्ञानराजा | जो या सिद्धेश्वरीं करील पूजा |

तो अंतरंग सखा पैं माझा | मुक्ति सहजा झाली त्यासी ||७||

नामा म्हणे ऐसें अंतरंग | कैसा ओळला पांडुरंग |

ज्ञानदेवीं समाधी सांग | हरिपाठ कीर्तनें ||८||४||

## अभंग ५ वा

सनकादिकीं मंत्रघोष | केले विधिपूर्वक पांच दिवस |

मग पांडुरंग यथावकाश | भक्ता वास महिवरीं ||१||

धन्य भूमि अलंकापुरी | ज्ञानसमाधी खेचरी |

पूर्ण परिपूर्ण श्रीहरी | आपण उभा असे ||२||ध्रु.||

संत भागवत देव्हडे | अमर उभें चहुंकडें |

नारद तुंबर पुढें | विणे वाजविती ||३||

एकीं केला जयजकार | ज्ञानदेवीं धरुनियां कर |

विठ्ठलचरणासमोर | निकट बैसतें झाले ||४||

करें कुरवाळिलें ज्ञाना | कासवीं अवलोकिला पान्हा |

आसुवें येताती नयना | तया ज्ञानदेवाचिया ||५||

विठोजी म्हणे ज्ञानांजना | तुझेनी कवित्वें हरे दारुणा |

उच्चारितां महाविघ्ना | सकळ पळतील ||६||

तुज आठविल जो भक्त | तो होईल विरक्त |

ऐसें विठोजी बोलत | येरु चरणीं रुळे ||७||

नामा म्हणे सकळ तीर्थराजा |तया कृपा कैसी केली सहजा |

एकादशीस दिधली पूजा | तया ज्ञानदेवासी ||८||५||

## अभंग ६ वा

स्नानविधि केलियां भक्ती | नाममंत्राचिया आवृत्ती |

मग प्रत्यक्ष पूजिली मूर्ती | विठोबाची ||१||

धन्य धन्य तो ज्ञान | राजा निवृत्ति निधान |

विठोजी आपण | भक्तां साह्ये ||२||ध्रु.||

मग सकळहि भक्त मेळीं | सहित वनमाळी |

बैसले त्या पाळीं | इंद्रायणीचें ||३||

एकीं केलीं स्तुतिस्तोत्रें | एक जपतातीं नाममंत्रें |

एक गाताती वेदस्तोत्रें | विठोबासी ||४||

तंव पुढारा झाला नारा | तो नामयाचा पुत्र सैरा |

तो पुसतसे विचारा | नामयासी ||५||

ये संत सभेमाजीं | राउळ बैसलें असे सहजीं |

यासी पुसीजो जी कां जी | कोण क्षेत्र म्हणोनी ||६||

उठिला नामा प्रेमें डुले | वंदिलीं विठ्ठलपाऊलें |

मग करद्वय जोडोनि बोले | साशंकित ||७||

नामा म्हणे पूर्ण ब्रह्म | तें कैसें सभासदीं सम |

तें बोलतसे परम | ज्ञानदेवा भाग्य ||८||६||

## अभंग ७ वा

मग सकळ प्रेम पुतळे | बैसलें माजीं ब्रह्ममेळें |
तेथें नामा वचन बोले | स्वामीप्रती ||१||

वोळलें चैतन्य सतरावें | पूर्ण नाम ओघ विठ्ठलदेवें |
पव्हे घालूनि ज्ञानदेवें | जग तारिलें कीर्तनें ||२||ध्रु.||

नामा म्हणे स्वामी सर्वज्ञ | चरणरजें पाप भग्न |
परि आमुचें मन निमग्न | पवित्र झालें ||३||

तरी स्वामीराजा विनंती | परियेसी गा माझी पुढती |
हे अलंकापुरी होती | कवणीयें युगीं ||४||

हें सांगिजो जी समर्था | कवण क्षेत्र कवण तीर्था |
येथें क्षेत्रज्ञ हा सर्वथा | कवण धर्म असे ||५||

तूं आत्माराम संपन्न | युगादि जुनाट नारायण |
तुजप्रति हें वचन | न साहे माझें ||६||

कासवीचा तूं सार गाढा | तैसा हा तुझा पवाडा |
हें पुसणें कवणिया चाडा | तें तूंचि जाणता ||७||

नामा उभा तिष्ठत प्रेमें | संत दाटलें सप्रेमें |
तेथें अनुक्रमें | सांगतसे ||८||७||

## अभंग ८ वा

देवासी कळलें गौप्यगुज | म्हणे रे नामया हेंचि चोज |

तो निजभाव सहज | प्रगट सांगों आतां ||१||

कृतायुगीं क्षेत्र आदि । ज्ञानदेवा तेथें समाधि |

देव सांगतसे शुद्धि | योगबुद्धि जुनाट ||२||ध्रु.||

ऐकें भक्तजनश्रेष्ठा | भूमिनामें वैकुंठपीठा |

तें हें अलंकापुरीं श्रेष्ठा | आदि वरिष्ठा पीठ आठरा ||३||

आणिक ऐकें रे वचन | हे पंचक्रोशी पुरातन |

यासी युगें सांगतां संपन्न | चतुरानन जाणतसे ||४||

कांहीं एक किंचित सांगों | युगसंख्या मार्गात रिघों |

तरी वैवस्वतु हाचि मागो | पूर्ण वोळंगों यापासुनी ||५||

एक मनु सहस्रयुग संख्या | तैं अलंकापुरीं आदि लक्षा |

कोटी याग असंख्या | सहस्र दक्ष येथें ||६||

आदि क्षेत्र संख्यारहित | ऋषिमुनीं तपती सत्य |

आणि नारदमुनि असे सांगत | हेचि पुरी पुरातन ||७||

नामा म्हणे कैसें दिधलें | हें ज्ञानासी सिद्ध लाधलें |

तेंचि आम्हासी जोडलें | पूर्ण लाधलें पियुष ||८||८||

## अभंग ९ वा

देव म्हणे नामया | ऐकें येथें चित्त देउनियां |

एकएक तीर्थ सांगावया| हें तों पुराणीं असे ||१||

न कळे देवाची थोरी | कैसें पुढारिले मुरारी |

गौप्यगुज श्रीहरी | सांगतसे नामया ||२||ध्रु.||

पुराणीं म्हणसी कोण कथा | तरी ऐकें गा तूं सकळार्था |

शैवशास्त्रीं हा ग्रंथ सर्वथा | सिद्‌ध मार्ग असे ||३||

जें जें जुनाट तीर्थक्षेत्र | जें जें ब्रह्मनामें परमार्थ |

तें तें सांगितला हेत | चतुराननें ||४||

ऐसें देवामुखींचें वचन | ऐकतां संतोषले पूर्ण |

मग देताति आलिंगन | एकमेकांसी ||५||

जयजयकाराचा ध्वनी | विठ्ठल नामें गर्जे वाणी |

प्रेम ओसंडत नयनीं | स्फुंदन रोमांचित दाटले ||६||

स्फुंदत नामा नाचे गाये | परिसा म्हणे वोळली मायें |

तो ज्ञानासी पान्हा होये | पूर्ण बोधाचा ||७||

नामा म्हणे सकळ संतमेळीं | कथा सांगितली रसाळीं |

तंव ज्ञानदेवा करतलामळीं | समाधी शेज घातली ||८||९||

## अभंग १० वा

मग म्हणे सर्वज्ञ विठ्ठल | न लावावा वाढ वेळ |

मग पातले निर्मळ | सिद्धेश्वरलिंगीं ||१||

धन्य धन्य हरिदिवस | धन्य धन्य हा निवास |

आपण हृषीकेश | भक्ता साह्य ||२||ध्रु.||

वैष्णव मीनले संपन्न | गाती हरिनाम कीर्तन |

तंव पातले सोपान | प्रेमें वोसंडत ||३||

चरणीं घातली मिठी | विठोजी म्हणे उठीं उठीं |

लवलाहे उघडीं दृष्टी | भेटीं ज्ञानदेवा ||४||

येरु म्हणे मी कृतकृत्य | नामस्मरण तुझें नित्य |

तेणें सकळही हित | आमुचें झालें ||५||

तूंचि गा जनकजननी | तूंचि एक त्रिभुवनीं |

पाहतां नित्य उन्मनीं | लागें आम्हां ||६||

समाधी सेज ज्ञानासी | तुंवा घातली अहर्निशीं |

ते कर्णीं परिसत जीवेंसी | चरण धरीत आलों ||७||

नामा म्हणे ज्ञान सोपान | एक झाले जनीं जनार्दन |

समाधी संगें संजीवन | अलंकापुरीसी आले ||८||१०||

## अभंग ११ वा

तंव निवृत्तीसी उन्मनी | बैसका होती सप्तदिनी |

ते पालटोनि तत्क्षणीं | श्री मूर्तिते न्याहाळी ||१||

निवृत्ति निधान | सोपान निजधन |

ज्ञानदेव आपण | तिन्ही मूर्ती ||२||ध्रु.||

कोण भाग्याचे संतुष्ट | जेथें प्रगटलें वैकुंठ |

विठ्ठलनामें पूर्ण पाठ | अलंकापुरीसी ||३||

आदिक्षेत्र जुनाट | युगें सांगतां उद्भट |

जे कां पुण्यरूप प्रगट | सांगतसे महिमा ||४||

ऐसा उत्साह गमला | निवृत्ति ध्यानीं निवाला |

सोपान आलिंगिला | ज्ञानराजें ||५||

निवृत्ति पाहे ज्ञानाकडें | येरू धांवे लवडसवडें |

चरणरजामाजीं बुडे | मन निमग्न केलें ||६||

तिन्ही देव एकत्र | सत्वरजतमादि मंत्र |

हें गाताती नर जे स्तोत्र | ते उद्धरती सर्वदा ||७||

नामा म्हणे तिन्ही देव | मिळाले गुणसागर वैभव |

समाधीसेज माधव | देतु ज्ञानदेवा ||८||११||

## अभंग १२ वा

हस्त ठेवी माथया | ज्ञानदेव लागे पायां |

विठोजी म्हणे लवलाह्या | समाधीस बैसावें ||१||

इंद्र चंद्र देव येती | ब्रह्मादिक गीतीं गाती |

यमवरुणबृहस्पती | विमानें दाटती अंतरिक्षीं ||२||ध्रु.||

तंव पातले गरुडदेव | रुक्मिणी सत्यभामा भाव |

राही माता गोपी सर्व | समाधी ज्ञानदेव पहावया ||३||

इंद्रचंद्रप्रजापती | सर्व अंतरिक्षीं पाहाती |

अलंकापुरीं ये श्रीपती | हरुष चित्तीं ज्ञानदेवा ||४||

ऋषिमुनी गणगंधर्व | पिशाच गुह्यक सर्व |

ध्रुव अंबऋषि माधव | चित्तीं भाव पहावया ||५||

ऐसीं दाटलीं विमानें | हें संतीं जाणितलें ज्ञानें |

ज्ञानदेव ब्रह्म होणें | हें विंदान विठ्ठलाचें ||६||

जयजय शब्दें ध्वनी गर्जे | तेणें स्वर्गमृत्युपाताळ गाजे |

पाताळीं शेष म्हणे भुंजे | प्रेम फुंजें न समाये ||७||

नामा म्हणे शिवादिक | सिद्धेश्वरीं मिळोनि सकळीक |

पाहती विठ्ठल कौतुक | ज्ञानदेव समाधीचें ||८||१२||

## अभंग १३ वा

वेदध्वनी केलीया मुनी | गंधर्व गायनें होती गगनीं |

ब्रह्मादिक इंद्र विमानीं | इंद्रायणी ज्ञानदेवी ||१||

लागलिया मंगळतुरे ध्वनी | तीर्थें असती उभीं कर जोडुनी |

विठ्ठलदेव ज्ञान संजीवनीं | नयनीं न्याहाळिती ||२||ध्रु.||

राही रखुमाई माता | सत्यभामा गोपी समस्ता |

आरतिया ओंवाळिती निभ्रांता | ब्रह्मत्वरिता ज्ञानदेवा ||३||

देवऋषिगण सकळ | जयजयकार ध्वनी मंजुळ |

स्तुतिस्तोत्रें सकळ | नक्षत्रादि गाती ||४||

वरुषती दिव्यसुमनें | निवृत्ति सोपान नारायणें |

संबोखिलें संजीवनें | नित्य पारणें हरिपाठें ||५||

परिसा भागवत डुल्लत | विठ्ठलीं झाला कृतकृत्य |

नामा असे शोकाकुलित | चरणीं रत विठ्ठलाचे ||६||

सेज घालुनी सुमनीं | विठ्ठल पाहे रुक्मिणी |

ज्ञानदेवाचे गुण मनीं | आठवती मनी हरि ||७||

नामा झाला भयभीत चित्तें | ज्ञानासारखें रत्न मागुतें |

न देखों ऐसें विठ्ठलातें | पुसे त्वरित रुक्मिणी ||८||१३||

## अभंग १४ वा

देवो म्हणती रुक्मिणी | हाचि एक योगी देखिला नयनीं |
हेंचि ज्ञानसंजीवनी | जाण त्रैलोक्यासीं ||१||

धन्य धन्य धरातळीं । जो यातें दृष्टीं न्याहाळी ।
तो वाहात येईल टाळी । वैकुंठभुवनासी ॥२॥ध्रु.||

जो करील याची यात्रा । तो तारील सकळ गोत्रां ।
सकळही कुळें पवित्रा । याचेनि दर्शनें होती ॥३॥

अलंकापुरीं हें शिवपीठ । पूर्वी येथें होते नीळकंठ ।
ब्रह्मादिकीं तप वरिष्ठ । येथेंचि पैं केलें ॥४॥

इंद्र येऊनियां भूमिसी । याग संपादिले अहर्निशी ।
इंद्रायणी इंदोरिसीं । पंचक्रोशी या पासुनि ॥५॥

येथें त्रिवेणी गुप्त असे । भैरवापासूनि भागीरथी वसे ।
पूर्ववटीं जे माया दिसे । ते प्रत्यक्ष जाण पार्वती ॥६॥

भोवती वनवल्लिवृक्ष । येथें देव येऊनि होती पक्ष ।
हे असे नित्यसाक्ष । अस्थी नासती उदकीं ॥७॥

हें पंढरीहुनी सोपें । जनाचीं हरावया पापें ।
कळिकाळ कोपलियां कोपें । न चाले त्याचें अलंकापुरीसी ॥८॥

ऐसें सांगतां हरिसी । प्रेम ओसंडलें रुक्मिणीसी ।
म्हणे धन्य धन्य जयाचे कुसीं । ज्ञानदेव जन्मले ॥९॥

नामा म्हणे माझा स्वामी । सवें संतसमागमीं ।
ऐसें सांगितलें ग्रामीं । अलंकापुरीसी ॥१०॥१४||

## अभंग १५ वा

तंव पुसती होय माता । तुम्हीं झणें खेद करा चित्ता |
तरी ज्ञानासारिखा कां आतां । समाधीसी बैसविता ॥१॥

हे सांगावें सविस्तर । यांचे कोण कोण अवतार ।
बंधु त्रिवर्ग साचार । आणि ते भगिनी ॥२॥

देव म्हणती ब्रह्मा होय । सोपानदेव नेणसी काय ।
निवृत्ति शिव ज्योतिर्मय । ज्ञानदेव ब्रह्म निघोट ॥३॥

ऐसे ब्रह्मा विष्णु हर । मुक्ताई ते मूळमाता साचार ।
तारावया चराचर । कलीमाजीं अवतरले ॥४॥

रुक्मिणी पुसे देवासी । कां कलीमाजीं जन दोषी ।
हे घातली देवा पुसी । ते सांगती महाविष्णु ॥५॥

तरी ऐकें हो साचार चित्तें । तूं काय नेणसी त्या व्यासातें ।
ग्रंथीं सांगितलें भारतें । कलीमाजीं जन दोषी ॥६॥

कृष्ण अवतार झाला । पांडवीं निजठाव ठाकिला ।।
तेथून एक शक जाला । जनमेजयापासूनि ॥७॥

तयामागें विक्रमशक । पुण्यपवित्र सकळ लोक ।
कलियुगीं पुण्यश्लोक । उज्जनिये नांदती ॥८||

तेणें एक शत पंचतीस । हरिले कळिकाळदोष ।
पुढे शालिवाहन व्हावयास । अवतार जाण पैठणीं ॥९॥

तो हा शालिवाहन । अठरा हजार जाण ।
ते क्षेत्र प्रतिष्ठान । गंगातीरीं प्रत्यक्ष ॥१०॥

या शकामाजी प्रथम । राजा भोज उत्तम ।

मग पुण्यपुरुष जन्म । थोडे घेतील कलियुगीं ॥११॥

राजे भ्रष्ट यवन झाले । ठायीं ठायीं दोष घडले ।

मग इहीं अवतार घेतले । कलिदोष हरावया ॥१२॥

रुक्मिणी म्हणे स्वामी । सत्य सांगितलें तुम्ही ।

पुराणप्रसिद्ध आम्ही । अवतार चरित्र जाणतसों ॥१३॥

नामा म्हणे पुढें हें जन । यवनसंसर्गे कठीण ।

होतां गातां हरीचे गुण । ते उद्धरती सर्वथा ॥१४॥१५||

## अभंग १६ वा

पुष्पक विमानातळीं । हरि उतरले भूतळीं ।

तंव उदयो पूर्वमेळीं । सूर्याचा झाला ॥१॥

धन्य धन्य प्रश्नोत्तर । धन्य धन्य ते तरूवर ।
धन्य ज्ञानदेव अवतार । तिन्ही देव प्रगटले ॥२॥ध्रु.||

संत सनकादिक देव । आणि भक्त आले सर्व ।

स्नानें करूनियां भाव । हरिचरणीं ठेविला ॥३॥

विलाप मांडियेला भक्तीं। खंति करिती त्रिजगतीं ।

ज्ञानदेवासारिखी मूर्ति । न देखों म्हणती देवराया ॥४॥

देव म्हणती निवत्ति । तूं प्रत्यक्ष शिवमूर्ति ।
तारावया सकळ क्षितीं । अवतार धरियेला ॥५॥

सोपानें घातलें लोटांगण । मुक्ताईनें धरिलें चरण ।

संत करिताती स्तवन । पांडुरंगरायाचें ॥६॥

मग संबोखूनियां हरी । सोपानदेवा धरिला करीं ।

निवृत्ति मस्तकावरी । करकमळ हरि ठेवितसे ॥७॥

नारा विठा पुढें चाले । ऐसें इंद्रायणीस आले ।
सौंदडी वृक्षातळीं बैसले । सपरिवारें सकळ भक्त ॥८॥

न्याहाळिती कांसवदृष्टी । ऐसा हरि चालत सृष्टी।
नामा होतसे हिंपुटी । ज्ञानदेवाकारणें ॥९॥१६||

## अभंग १७ वा

तंव अंतरिक्ष गगनीं । अवचिती जाली आश्रीणी ।

भक्त तरतील मेदिनी । ज्ञानदेव दरुषणें ॥१॥

धन्य धन्य वृक्ष अजान । धन्य धन्य सिद्धेश्वरस्थान ।

ज्ञानदेवा समाधान । धन्य आळंकापुरी ॥२॥ध्रु. ||

ऐसी आश्रीणी वदली । जयजयकारें टाळी पिटीली ।

तंव स्नानसंध्या सारिली । देवभक्तीं सकळिकीं ॥३॥

मग पाहोनियां शुभदिन । देवें करूं आदरिलें प्रयाण ।

नामा होतसे खेदक्षीण । ज्ञानदेवाकारणें ॥४॥१७||

## अभंग १८ वा

मग प्रश्न आदरिला । नामा स्फुदों जो लागला।

कां गा ज्ञानदेवो गेला । मज सांडुनियां ॥१॥

कैसा होय तुझा दास । कैसी पाहों तुझी वास ।

ज्ञानाकारणें कासाविस । जीव माझा होतसे ॥२॥ध्रु.||

देव म्हणे नामयासी । तूं झणीं कासाविस होसी ।

तूं रें तयातें नेणसी । तें कैसें आईक ॥३॥

ज्ञानदेव ज्ञानसागरू । ज्ञानदेव ज्ञानआगरू।

ज्ञानदेव भवसिंधुतारूं । प्रत्यक्ष रूपें पैं असे ॥४॥

ज्ञानदेवी ज्ञानगम्य । ज्ञानदेवी ज्ञानधर्म्य ।

ज्ञानदेवी ज्ञाननेम । सर्वथैव पैं असे ॥५॥

ज्ञानदेव हाचि देव । ज्ञानदेवीं धरिलिया भाव ।

ज्ञान होईल जीवां सर्व । यासी संदेह पैं नाहीं ॥६॥

ज्ञानदेवीं धरितां ध्यान । ध्यातां होय समाधान ।

जीव शिवीं परिपूर्ण । एक रात्री कीर्तनें ॥७॥

झणे तूं व्याकुळ होसी चित्तें । मनीं आठवी गा मातें।

नामस्मरणें एका चित्तें । रामकृष्ण गोविंद ॥८॥

नामा म्हणे तूं समर्थ होसी । अर्जुनीं प्रीति करिसी ।

हे सांगितलें व्यासीं । एकादशाध्यायीं ॥९॥

शिव पावे तूं विश्वेशा । विश्वरूपा जगन्निवासा ।

मी होतसे कासाविसा । ज्ञानदेवाकारणें ॥१०॥

तरी तूं गा युगानयुगीं । अससी भक्तांचिया संगीं।
आम्ही विनटलों पांडुरंगीं । रंगारंगीं विट्ठलीं ॥११॥
एक वेळ माझा शोक । दुरी जाय हरे विख ।
तें करी निर्विशेष । नामा येतसे काकुलती ॥१२॥१८||

## अभंग १९ वा

तंव नावेक श्रीहरी । तटस्थ घटिका चारी ।

ध्यान धरूनि अंतरीं । निश्चळ राहिला ॥१॥

जयजयशब्दे नामा बोभाये । केशवा गा त्राहे त्राहे ।

मी व्याकुळ होत आहे । ज्ञानदेवाकारणें ॥२॥ध्रु.||

नारायणा त्राहे त्राहे । कृपादृष्टी तूं रे पाहे ।

मी व्याकुळ होत आहे । ज्ञानदेवाकारणें ।।३||

तुझेनि दरुशनें । ज्ञानाचेनि अवलोकनें ।

मज पंढरीस असणें । तुझे चरणीं गा विठ्ठला ॥४॥

ज्ञानदेवावीण कदा काळीं । मज न कंठवे भूमंडळी ।

आतां मज तूं सांभाळी । भानुसहित वर्ततां ।।५॥

तूं माझी जनक जननी । परि ज्ञानदेवावीण मेदिनी ।

शन्य वाटे हे धरणी । जैसे मत्स्य जीवनेंवीण ।।६॥

तूं रक्षिता सर्व जीवांसी । तरी कां दुःख दिधलें आम्हांसी ।

तूं जवळी असतां हृषिकेशी । ऐसी दशा हे प्राप्त ।।७॥

नामा खेदें क्षीण जाला जीवें । तंव नेत्र उघडिले देवें ।

आलिंगिला केशवें । चारी भुजा पसरोनी ॥८॥१९||

## अभंग २० वा

नामा न राहे खेद करूं । केशव ठेवी अभयें करू ।

म्हणे तूं दुःखिया होसी थोरू । ज्ञानदेवाकारणें ॥१॥

धन्य धन्य तुम्ही भक्त । नित्य विष्णुचरणी रत ।

पुण्यशील भाग्यवंत । ज्ञानदेव नामया ॥२॥ध्रु.॥

तुमचेनि जन हे कृतार्थ । कवित्वें तरेल हें सत्य ।

माया मोह निरसे समस्त । नामस्मरणें तुमचेनी ॥३॥

धन्य ज्ञानदेव ज्ञानशीळ । ज्ञानदेवा ऐसा सुढाळ ।

मी न देखें भूमंडळ । सकळहीं पाहतां ॥४॥

तूं करिसी खेद त्याचा । तरी तो माझा आत्मा साचा ।

भाव सांडीं सांडीं द्वैताचा । निखळ रूपें पाहे पां ॥५॥

तुम्ही भक्त अवघे आवडते । तुमचेनि साजिरे पूर्णचित्तें ।

मज पंढरिस येणें आवडतें । नाम गाताती ये प्रीतीं ॥६॥

पुंडलिक माझा भक्त सखा । परी प्रेमळ तुम्ही विशेषा ।

तुमचेनि सर्व दुःखा । हरलों मी हें जाणावें ॥७॥

नामा म्हणे ज्ञानदेवाचें । मज दर्शन होईल साचें ।

तरीच रंगणीं मी नाचें । श्रीहरिकीर्तनीं पंढरीसी ॥८॥२०॥

## अभंग २१ वा

ऐसें परियेसिलें विठलें । तंव रुक्मिणीने विनविलें ।

याचे करिजो जी म्हणितलें । हाकारिजो पुंडलिका ॥१॥

धन्य धन्य धरातळीं । जो या लोकालोक वनमाळी ।

वैष्णवीं पिटीली टाळी । जयजय शब्दें करूनियां ॥२॥ध्रु.॥

गरुडासी सांगे केशव । कैसा यासी भेटेल ज्ञानदेव ।

पुंडलिकासी जाऊनी सर्व । वृत्तांत सांगे येथींचा ॥३॥

तेणें नमस्कार करूनि हरी । निघाला पक्षाचां फडत्कारी।

भेटला पुंडलिका झडकरी । यथाविधीनें सांगितलें ॥४॥

पुंडलिक विस्मित चित्तीं । म्हणे धन्य धन्य ज्ञानमूर्ती ।

ज्या कारणें वैकुंठपती । अलंकापुरीसी गेले ॥५॥

धन्य धन्य विठोबाचे चरण । धन्य धन्य माझे नयन ।

धन्य नामरूपीं संपन्न । विष्णुभक्त सखा माझा ।।६॥

मग गरुडासि पूजिलें । ज्ञानदेवासी हाकारिलें ।

दिव्य विमानीं बैसविलें । चला म्हणितलें अलंकापुरीसी ॥७॥

नामा असे खेद करीत । केशव तयासी संबोखित ।

तुम्हा दोघांचा एकांत । माझेनि संगें पुरेल ॥८॥२१॥

## अभंग २२ वा

पुढें चालिला गरुड । आक्रमित अवघें ब्रह्मांड ।

मागें विमान शुभ्र प्रचंड । पुंडलिक आणितसे ॥१॥

धन्य हरिभक्तांचा मेळ । धन्य धन्य तो गोपाळ ।

धन्य अलंकापुरी सुढाळ । ज्ञानदेव येतसे ।।२।।ध्रु.||

दुरोनी लक्षित रुक्मिणी । हरूषें सांगे चक्रपाणि ।

पैल विमान येतसें गगनीं । दाखविजे नामया ॥३॥

मग नामयासी सावध । करूनियां तो गोविंद ।

म्हणे तुझा पुरविला छंद । पैल ज्ञानदेव येताहें ॥४॥

नेत्र विकासित पाहें । तंव गगनीं विमान दिसताहें।

पुंडलिक गरुड आहे । दिव्य देहीं दिव्य विमानीं ॥५॥

ऐसा जंव तटस्थ घटिका । तंव उतरलें निमिष एका ।

नामा पावला संतोषा । ज्ञानदेवा देखोनी ॥६॥

विमान घंटिका गर्जत । नामदेव पुढारा चालत |

जी जी रुक्मिणी म्हणत । वेगु कीजे ज्ञानदेवा ॥७॥

नामा ज्ञानदेव भेटले । पुंडलिकें विष्णु नमस्कारिलें ।

भक्तीं जय जय शब्द केले । देवीं पुष्पवृष्टि केलिया ॥८॥२२||

## अभंग २३ वा

आलिंगन पडिलें दृढ । मिठी पडिली न सुटे गूढ ।

पुंडलिक म्हणे मज चाड । या विठ्ठलचरणाची ॥१॥

तुझे दरुषणें माझा लाभ । जैसा ज्ञानदेवावरी लोभ ।

नामयावरी स्वयंभ । तैसाचि करीं गा विठ्ठला ॥२॥ध्रु.||

नामदेवें आलिंगुनी प्रीतीं । शिर चरणावरी अवचितीं ।

ज्ञानदेवाच्या ठेवी पुढतीं । म्हणे धन्य क्षितीं मी एक ॥३॥

पुंडलिक म्हणे नामया । धन्य धन्य तुझा थाया ।

क्षितीं आणिलें वैकुंठराया । ज्ञानदेवाचेनिं स्मरणें ॥४॥

धन्य युगानुयुगीं तुम्ही । धन्य देखिलेती रे आम्हीं ।

धन्य अलंकापुरी जन्मीं । उपजोनी जो देखेल ॥५॥

पंढरीहुनी हें मूळपीठ । जुनाट पैं वैकुंठ ।

पूर्वी येथें होते नीळकंठ । ब्रह्मा विष्णु रुद्र इंद्र ॥६॥

तें हे शिवक्षेत्र प्रत्यक्ष । पूर्वे मातुर्लिंग साक्ष ।

तेथेंहि केशव प्रत्यक्ष । चतुर्भुजरूपें असे ॥७॥

दक्षिणें पुण्येश्वर देवो । पुण्यस्थळ महादेवो ।

मूळपीठीं नागेंद्रीं पहा हो । त्रिवेणीरूपी वाहातसे ॥८॥

पश्चिमे इंदोरिये देवो । ब्रह्मेश्वर उत्तम ठावो ।

उत्तरें सिद्धेश्वर देवो । खेटकग्रामीं भागीरथी ॥९॥

मध्यस्थळीं हे इंद्रायणी । सरसी भागीरथी वाहिनी ।

सिद्धेश्वर शोभे स्थानीं । ज्ञानदेवा सहित ॥१०॥

ये दक्षिणवाहिनीसी । स्नान घडतां अहर्निशीं ।

कोटी तीर्थे प्रयाग काशी । प्रसन्न होती हरिहर ॥११॥

ऐसियें तीर्थी देवा । समाधि दिधली ज्ञानदेवा ।

पुंडलिक विनवितसे केशवा । धन्य भाग्य नामयाचें ॥१२॥२३||

## अभंग २४ वा

स्वर्ग मृत्यु पाताळ तिन्हीं ताळें उदर । विराटलें थोर विश्वरूप |१||

समाधिसंजीवन निवृत्तिसी फावले | तें निधान देखिलें आम्हीं तुम्हीं ॥२॥

निवृत्ति सोपान ज्ञानदेव निधी । मुक्ताई सिद्धी अलंकापुरीं ॥३॥ध्रु.||

पंढरी प्रत्यक्ष केली ज्ञानदेवें । उभारूनि बाहे सांगे आम्हां ॥४॥

कळिकाळासी त्रास विठ्ठल उच्चारीं । हरि चराचरीं क्षरला असे ॥५॥

सर्वत्र सबाह्य अंतरंग रूपडें । तें रूप फाडोवाडे पारखिलें ॥६॥

चिंतामणीचें सार कल्पतरू उघड । दावुनिया मूढ तारियेले ॥७॥

सुवर्णाचा पिंपळ तिहीं लोकी ठाउका । त्या समीप देखा कल्पतरू ॥८॥

सिद्धेश्वरलिंग सिद्धिबुद्धिदाता । जडजीवा मुक्तता देतु हरी ॥९॥

ऐसियें स्थानीं कीं ज्ञानदेव राहिले । राहोनि तारिले मूढ जन ॥१०॥

नामा म्हणे ज्ञानदेव हा दातार । जडजीवां उद्धार विठ्ठल हरी ॥११॥२४||

## अभंग २५ वा

तंव तेथें नवल वर्तलें । आकाश असे विमानी दाटलें ।

म्हणती मूळपीठ वैकुंठ देखिलें । पुंडलिका सकट ॥१॥

पंढरीहुनि आलें कैसें । पुंडलिक देव सरिसे ।

ज्ञानदेवासवें नामा असे । आणि विष्णुभक्त अपार ॥२॥धृ.||

राही रखुमाई सत्यभामा । गाई गोपाळ मेघःश्यामा ।

म्हणती पाहा हो महिमा । या विष्णुभक्तांचा ॥३॥

सवें ध्रुव प्रल्हाद अंबऋषी । रूक्मांगद सूर्यवंशी ।

आणि ऋषिमुनि तापसी । असे समवेत वनमाळी ।।४।।

बळी भीष्म नारद । उद्धव अक्रुर विद्‌गद ।

आणि बिभीषण सुबुद्ध । हनुमंत आदिकरूनि ॥५॥

हा हा हु हु गंधर्व गाती । रुणुझुणु रुणुरुणु पावे वाजती ।

देवांगना आरतिया ओवाळिती । देवभक्तांसहित ।।६॥

ऐसा शुभ काळ समयो । जाला भाग्याचा उदयो ।

ज्ञानदेव नामदेव पाहा हो । धन्य धन्य धरातळीं ॥७॥

नामा नुघडी दृष्टीसी । हृदयीं ध्यातसे हृषिकेशी ।

ज्ञानदेवो निजमानसीं । विष्णुमूर्तीसी लीन जाला ।।८॥२५||

## अभंग २६ वा

तंव बोलत उद्धव । धन्य धन्य हा देवाधिदेव ।

धन्य धन्य ज्ञानदेव । निजभक्त आवडता ॥१॥

धन्य तीर्थ इंद्रायणी । धन्य प्रत्यक्ष शूळपाणि ।

तारक ब्रह्म त्रिवेणी । मिश्रित रूपें वाहातसे ।।२।।ध्रु.||

चिंतामणि हे पाषाण । दिव्य वनवल्ली जाण ।

जेथें लागले हरिचे चरण । ते धन्य भूमि अलंकापुरी ॥३॥

जेथें समाधिसी बैसतां । इंद्रादि सामोरें येती तत्वतां ।

वैकुंठा जाईल निभ्रांता । रामकृष्ण उच्चारित ।।४।।

यम न पाहे इकडें । काळ नमस्कारी वाकोडें ।

म्हणती पाहा हो केव्हढें । भाग्य या ज्ञानदेवाचें ॥५॥

ऐसें उद्धव सांगे रुक्मिणी । होय म्हणती चक्रपाणि ।

पंढरीहुनि हे जुनाटपुराणीं । शैवागमी बोलिलेसे ॥६॥

ज्ञानदेवें नमस्कार केला । नामा हृदयीं धरिला ।

प्रीतीनें पुढती आलिंगिला । म्हणे धन्य धन्य रे सखया ॥७॥

नामा लोळत गडबडां । चरणरजालागीं झाला वेडा ।

केशव म्हणे तूं धडफुडा । विष्णुभक्त साचार ॥८॥२६||

## अभंग २७ वा

ऐसी प्रदक्षिणा करुनि विष्णुभक्ता । नामा जालासे सरता ।
रुक्मिणी म्हणे यातें तत्वतां । वैकुंठासी न्यावें जी ॥१॥

नामा म्हणे नेघें मुक्ती । मज पंढरीची आर्ती ।

विठ्ठलनामें करीन कीर्ती । नित्यकाळ जीवन्मुक्त ॥२॥ध्रु.||

मज नित्यमुक्ति जन्म नाहीं । केशवासी माते पुसोनि पाहीं।
युगानयुगीं अवतार दाहीं । याचेनि संगें मज घडती ॥३॥

तिहीं त्रिभुवनीं उदार । मुक्ति तुम्हापाशी साचार ।

परि भक्तिविण मुक्ति असार । कोण पामर इच्छिल ॥४॥

मुक्ति फलकट नैश्वर । फळ एक विठ्ठल सार ।

विष्णुभक्तिसी ज्याचा निर्धार । त्याचे चरण वंदीन माथां॥५॥
विष्णुविण कीर्तन न करी । भक्तिविण नसे क्षणभरी ।

कीर्तन करीन गजरीं । रामकृष्ण गोविंद ॥६॥

मज नामाचें अमृत हरि । माझें मुक्ति दास्य करी ।

तूं मूळमाता जाणसी जरी । तरी तुजसी हे गुह्य बोलिलों ॥७॥
नामदेव परतोनि पाहे । तंव ज्ञानदेवें उभारिले बाहे ।

म्हणे विष्णुभक्ति ऐसी आहे । आइक माते इचा साचार ॥८॥
||२७||

## अभंग २८ वा

भक्त अमर स्वस्ति क्षेम । चरणरजें डोरलें व्योम ।

मग कैलासी मंदाकिनी सोम । नीळकंठे धरियेली ॥१॥

धन्य विष्णुचरणींची गंगा । स्नपन होत महालिंगा ।

भीमरथीं मृत्युलोकी सवेगा । इंद्रायणी समरसें ॥२॥ध्रु.||

भोगावती पाताळा गेली । मग विष्णुचरणीं गुप्त ठेली ।

मग पुरोनियां उरली । त्र्यंबकशिखरीं ॥३॥

मग किती काळीं भागीरथी । भगीरथें आणिली भागिरथीं ।

सगर उद्धरिले त्वरितीं । विष्णुतीर्थे करूनियां ॥४॥

ऐसी त्रिभुवनीं ज्याची थोरी । तो मुकुटमणी हा हो श्रीहरी ।

त्यांतें सोडिलियां मुक्ति चारी । काय आम्हां तारिती ॥५॥

सर्वे तीर्थें ज्याचे रंक । आम्ही तयाचे सेवक ।

ज्याचें नामें हें त्रैलोक्य । नाम घेतां तरती ॥६॥

तो पूर्ण बीजमंत्र आम्ही जाणों । विष्णुविण कांहीं नेणों।

पूर्ण ब्रह्म काय म्हणों । हा महिमा तूं जाणसी ॥७॥

ज्ञानदेवें नमस्कारिले हरी । निवृत्ति सोपान झडकरी ।

मुक्ताई भेटली लवकरीं । ज्ञानदेवा करीं धरियलें ॥८॥२८||

## अभंग २९ वा

मग संतोष जाला हरिभक्तां । ज्ञानदेव झाला बोलता ।।
निवृत्तीसी म्हणे तुम्ही जावें आतां । त्र्यंबकशिखरासी ॥१॥
करूनि नमस्कार हरासी । वेगीं यावें वैकुंठ शिखरासी ।
नित्य हरिचरणापासीं । तुम्हीं आम्हीं सोपान ॥२॥

मुक्ताई म्हणे ज्ञानदेवा । मज विठोबासी निरवा ।

मजवरी लोभ असों द्यावा । रुक्मिणी आदिकरूनि ॥३॥
पुंडलिकासी निरवावें । समस्तांसी क्षेम सांगावें ।

रुक्मिणी मातेच्या द्यावें | हातीं मज ||४||

ज्ञाने करुनि विज्ञान । भक्तीसी करावें निरूपण ।

द्यावें समाधि संजीवन । तुम्ही यावें शीघ्रवत ॥५॥

निवत्तीनें दिधलें उत्तर । आम्हीं जाऊं वेगोत्तर ।
सोपानासीं मार्गी निरंतर । समाधीसी चालवूनि ।।६॥

तंव बोलिला यादवराणा । तुम्हीं मागितल्या समाधीच्या खुणा
परी नामयावरी जाणा । माझी कासवदृष्टी ।।७||

नामा म्हणे विठोबासी । तूं स्वामी दीनाचा होसी ।

गेलें निधान ज्ञानदेव दाखविशी । मज नयनीं प्रत्यक्ष
॥८॥२९||

## अभंग ३० वा

ऐसें बोलोनियां हरि | रुक्मिणीसी विचार करी |

यासी भोजनें परोपरी । अन्ने निपजवावीं ॥१॥

संतोष जाला हरिभक्तां । जेथें स्वयें हरि भोक्ता ।

कर्ता आणि करविता । सर्व चाळक विठ्ठल ॥२॥ध्रु.||

तंव दिव्यग्राम उभवुनि | भक्तिं देखिलें नयनीं ।

विश्वकर्मा येऊनी । उत्तरापंथें निर्मिले ॥३॥

तंव अष्टमहासिद्धी । सर्व सामोग्रीची समृद्धि ।

कर जोडोनी कृपानिधी । विनविती आनंदें ।।४।।

दिव्यवनें दिव्यवल्ली । दिव्यसुमनें समग्र झालीं ।

वैकुंठीहुनि आणिलीं । महाविष्णुकारणे ॥५॥

तेथें सुगंध परिमळ । जवादि कस्तुरी निर्मळ ।

चिंतामणी देती ढाळ । नाना कीळ दीप्तीचे ॥६॥

चंदनाचे खांब उभारिले । पवळ वेलीचे शोभले ।

मुक्ताफळांचे घोस मिरवले । रत्नखचित दामोदरें ॥७॥

चंपक सुमनाचियां हारी । सेवंती बटमोगरे नाना परी ।
नाना पुष्पी परिमळ आगरी । दिव्यवनेंसी शोभती ।।८।।

ऊस खर्जूरिया पोफळी । फणसें नारिंगें नारिकेळीं ।

कर्दळी वाढिन्नल्या सरळी । उदक पाट वाहताती ॥९॥

तेथें भ्रमर रुणुझुणु करिती । कोकिळा सुस्वरें बोलती ।
पारवे आनंदें घुमघुमिती । सुखें संवादती निजगजरें ।।१०||

तलालौरी गीत वाजविती । गोपाळ विणे वाजविती ।

नाना परी बागडें धरिती । देव पाहती विमानीं ॥११॥

थकली योगियांची ध्यानें । निश्चळ राहिलीं आसनें ।

निवृत्ती आणि सोपानें । तेथें देव्हडें उभे असती ।।१२।।

नामा जातो लोटांगणीं । वैकुंठ उतरलें मेदिनीं ।

अलंकापुरीं पाटणीं । उत्तरापंथें देखिलें ॥१३॥

जेथें त्रिभुवनिचे निधान । स्वयं आपण भगवान ।

तेथें सकळ काम होती पूर्ण । जाणती खुण अंतरंग भक्त ॥१४||

नामा म्हणे ऐसी विंदानें । भक्तीलागी जगजीवनें ।

प्रत्यक्ष वैकुंठ भुवनें । दासा सुखसंपन्न करावया ।।१५।।

## अभंग ३१ वा

ऐसें देखिलें वैष्णवीं । वैकुंठ नगरी चिरंजीवी ।
आणि ज्ञानदेव गोसावी । विष्णमूर्ती चतुर्भुज ॥१॥

तलालोरी वाजविती पावा । समाधान होतसे जीवां ।

नामा विनवितसे केशवा । तुझ्या दरुशनें निवालों ॥२॥धृ.||

तंव रुक्मिणीनें विनविलें । यासि भोजन सारा कीं वहिलें ।

तंव अक्रूरें पाचारिलें । समस्तांसी देखा ॥३॥

उद्धव घालितसे आसनें । ताटीं विस्तारिलीं बोनें ।

राही रुक्मिणी विचक्षणें । पंचामृतें वाढिती ॥४॥

समस्त भक्त दाटले । पांथीकर एकवटले ।

नानापरी भात विस्तारिले । परिमळित घमघमा ॥५॥

वरी मिरवें मुगाचें वरण । कथिका वाढिली संपूर्ण ।

नाना कोरिकें विस्तीर्ण । रुक्मिणी वाढितसे ॥६॥

कामधेनूचें घृत । पयोदधिक्षीर वाढित |
नाना पत्र शाखा शोभत । वैष्णवांच्या ताटी ।|७॥

ऐसें समस्तांसी संपूर्ण । भोजनासी बैसविलें प्रीतिकरून |

तंव देव बोलती आपण । ज्ञानदेवासी ॥८॥
निवृत्ती सोपान बोलवा । मुक्ताईस वेगी आणवा ।

पांथिकरासी रिघावा । ताटी बैसवा समस्तांसी ॥९॥

विष्णुमूर्ती चतुर्भुज । पूजी ब्राह्मण द्विभुज ।

तुळसी मंजिरी केशीराज । त्यांचे मस्तकी वाहतसे ॥१०॥
चरणतीर्थ घेतलें । तेणें समस्त मंदिर शिंपिलें ।

आपण मुखी घातलें । म्हणे कृतकृत्य झालों मी ॥११॥

नामा तिष्ठत उभा द्वारीं । त्यासीही रुक्मिणी ताट करी ।

ऐसी भोजनें परोपरी । वैष्णवांची जाहली ।।१२॥३१||

## अभंग ३२ वा

ऐसे भक्त जेवुनि धाले । समस्त पांथीकर एकवटले ।

गोपाळें विडे दिधले । आपुलेनि हातें ॥१॥

धन्य धन्य तें भोजन । धन्य धन्य तें निधान ।

धन्य धन्य तें अजान । धन्य नारायण अलंकापुरी ॥२॥

विठ्ठलें दिधलें वचन । यांसी घाला रे आसन ।

तंव उद्धवें आपण । समस्तां बैसकार दिधले ॥३॥

पूजिलें गंधाक्षता लावुनि । टिळे उटी कपुर चंदनीं ।

ऐसे तियें वैकुंठभुवनीं । वैष्णवांसी पूजितसे ||४||

तंव म्हणे रुक्मिणी । नामा आणा बुझावुनि ।

आपलेनि हातें चक्रपाणि । त्यासी ग्रास घालावा ॥५॥

ऐसें सांगतां हरीसी । बुझाविती नामयासी ।

तो स्फुंदत उकसाबुकसीं । मग चहूंकरी हरीनें उचलिला ॥६॥

सवें संतांचा मेळा । तयामाजीं परब्रह्म पुतळा । नामा
बुझावोनी तात्काळा । देहावरी आणिला ॥७॥

तंव विस्तारोनि आणिलीं ताटें । षड्स अन्ने बरवंटें ।

रुक्मिणी आणि जेथें वैकुंठें । भक्तांसहित उभे असे ॥८॥

नामयातें संबोखोनि हरि । बसविला मांडियेवरी ।

कवळ घ्यावया मुख पसरी । मग चहूंकरीं हरि घालितसे ॥९॥
नामा आनंदें डुल्लत । तृप्त जाला प्रेमें ओसंडत ।

सकळ संतां कवळ देत । आपुलेनि निजकरें ॥१०॥

## अभंग ३३ वा

ऐसा येकवळा भक्तांचा । भोक्ता हरी वैकुंठींचा ।

उतरोनी अलंकापुरीं साचा । करी भक्तांचा उत्साव ॥१॥

ऐसे जेवूनि धाले । हरिकरेंचि निवाले ।

मग सुखें रहिवासलें । सकळे भक्त वैकुंठीं ॥२॥

देव म्हणती निवृत्तीसी । तुम्ही जावें त्र्यंबकशिखरासी ।

मग समाधी सरिसी । गंगोदकें करूनि घ्यावी ॥३॥

तंव सोपान म्हणे स्वामी । पूर्वी बोलिलेती तुम्हीं ।

करेपाठार संवत्सरग्रामीं । समाधी देऊं म्हणउणी॥४॥

देव म्हणती संतांसि पुसा । हा ज्ञानदेव असे सरिसा ।

हाही दिव्यदेहीं आम्हांसरिसा । येईल तेथवरी ॥५॥

मुक्ताई म्हणे देवाधिदेवा । आम्हीं करावी चरणसेवा ।

तुझेनि विचारें जी केशवा । समाधीधन भक्तांसी ॥६॥

ऐसा करितां विचार । तंव पातला राजा इंद्र ।

भक्ती केलें जयजयकार । देवें दुंदुभी वाजिन्नल्या ॥७॥

संत सनकादिकीं स्तोत्रें । मुखीं आरंभिलीं पवित्रें ।

गाती हरीनाम चरित्रें । देव ऋषिगण सकळीक ॥८॥

धन्य अलंकापुरी ग्राम । जेथे प्रत्यक्ष पुरुषोत्तम ।

उतरोनि वैकुंठधाम । सोहळा करी भक्तांचा ॥९॥

नामा नाचे हरिचें द्वारीं । ब्रह्मांड गर्जे जयजयकारी।

निवृत्ति सोपान म्हणे हरी । आम्हां निरंतरीं सांभाळीं ॥१०॥

# अभंग ३४ वा

नाना गंधें तुलसीमाळा । वैष्णवीं घातलिया गळां ।
नमस्कार करिती गोपाळा । चरणरजा वंदिती ॥१॥

दोही बाही देव्हुडे । संत सनकादिक गाढे ।

जयजयकार पुढें । महाशब्दें गर्जिन्नले ॥२॥ध्रु.||

ऐसे इंद्रायणीच्या तटीं । हरि रुक्मिणी जगजेठी ।

संत सनकादिकांची गोमटी । मांदी मिळाली असे ।।३।।

तंव पुंडलिकें नमस्कार केला । म्हणे तूं कां गा येथे विठो उगला ।
बहुत दिवस राहिला । या ज्ञानदेवाकारणें ॥४॥

तरी पंढरीहुनि हें श्रेष्ठ । तूं येथे उभा अससी प्रगट ।

भूमी उतरलें वैकुंठ । या ज्ञानदेवाकारणें ॥५॥

बहुत दिवस येथेंचि झाले । मी न देखें विटेवरी जंव पाउलें।

तंव नयन माझे भुकेले । राहतील देवराया ॥६॥

देव म्हणती पुंडलिका । तूं भक्त माझा निजसखा ।

आणि हा ज्ञानदेव देखा । दुजा न देखों त्रिभुवनीं ॥७॥

हे संत सनकादिक माझे । यांचेनि समागमें माझें बीजें ।

नामा डौरवीन यांचे चरणरजें । मग जाऊं रे पंढरीसी ॥८॥३४||

## अभंग ३५ वा

सर्व तीर्थे मिळाली अनंतें । ते सुखी करूं कृतार्थे ।

संवत्सरा जावोनी सोपानातें । समाधीसी बैसवूं ॥१॥

अनंत सुखाचिया रासी । उदैल्या भक्तांचिया मानसीं ।

आनंद जाला पुंडलिकासी । मग न बोले कांहीं ॥२॥ध्रु.||

सोपान म्हणे वैकुंठा । बिजें किजो जी महाश्रेष्ठा ।

संवत्सर ग्राम कऱ्हें तटां । वैकुंठासहित चालावें ॥३॥

इंद्रचंद्रब्रह्मादि देव । आणि गण मिळाले सर्व ।

तेहतीस कोटी देव । विमानीं आरूढले देखा ॥४॥

निवृत्ति सोपान ज्ञानदेव । त्रिमूर्ति तिन्ही देव ।

धर्मरक्षणार्थ पाहा हो । मनुष्यरूपें अवतरले ॥५॥

तिघेही उभे सन्मुख । तिघांही थोर संतोष ।

विनविती केशवास । स्वामी विनंति अवधारिजो ॥६॥

हे अलंकापूरीसी । स्थापावें कोटी तीर्थांसी ।

जो जो भक्त येईल स्नानासी । तो वैकुंठासि आणावा ॥७॥

ऐसें ऐकोनि श्रीहरी । म्हणे धन्य धन्य तुमची वैखरी ।

जगदोद्धार केला संसारीं । बावीस वर्षे असतां पैं ॥८॥

जो जो दिवस उगवला । तो तो ज्ञानदेवें सफळ केला ।

पदपदांतर कथिला । जेणें आत्माराम संतोषे ॥९॥

पूर्वी अनंत भक्त झाले । पूढेंही भविष्य बोलिलें ।

परी निवृत्ती ज्ञानदेवें सोडविले । अपार जीवजंतू ॥१०॥
जो अभक्त मनुष्यगण प्राणी । ज्यांचा भार न साहे मेदिनी ।
मग इहीं अवतार घेउनी । जग तारिलें कीर्तनें ॥११॥
नामा पंढरीये नाचत । ज्ञानेश्वर अलंकापुरीं शोभत ।
सोपान संवत्सरी मिरवत । निवृत्ति त्र्यंबकशिखरी ॥१२।।३५||

## अभंग ३६ वा

ऐसें पांडुरंग बोलिले । मग सकळ तीर्थांसी सांगितलें ।

अलंकापुरीं वसिजे वहिलें । भक्त तारावया ॥१॥

जो जो करील कीर्तन । तो तो तरेल जाण ।

अलंकापुरीं नारायण । स्वयें उभे असती ॥२॥ध्रु.॥

ऐसा निरोप तीर्थांसि । ते तिष्ठती अहर्निशीं ।

कीर्तन करितां गजरेंसि । वैकुंठासी नेवों म्हणती ॥३॥

देव म्हणे यमुना नर्मदा । सरस्वति भागीरथी त्रिविधा ।

गंगा कृष्णा तुंगभद्रा । इंद्रायणीस मिळावें ॥४॥

जो जो भक्त येईल स्नाना । तो पवित्र करावा या क्षणा।

वैकुंठ कैलासापर्यंत जाणा । त्यासी घेवुनि यावें ॥५॥

हो म्हणती तीर्थें सकळें । मग मीनली आपुलेनि मेळें ।

गुप्त राहोनि यथाकाळें । आज्ञा शिरसा वंदिती ॥६॥

गया काशी त्रिवेणी । त्या शोभती विठ्ठलचरणीं ।

ज्ञानदेवा समाधिरंगणीं । अखंड वाहों लागल्या ॥७॥

सुवर्णाचा अश्वत्थ । द्वारी स्थापुनियां वास ।

भोंवतें देव्हुडे तापस । समाधीस बैसले ॥८॥

देव म्हणे येथें जो करील तप । तो होईल निष्पाप ।

केवळ होईल शिवरूप । आत्माराम साक्षात ॥९॥

जप तप नेम मंत्र जाण । कोटी याग घडले पूर्ण ।

अथवा द्विजा दिधलिया अन्न । चतुर्भुज नर होती ॥१०॥

ऐसें वचन सांगे हरी । ज्ञानदेवासी धरिलें करी ।

निवृत्ति सोपान अंतरीं । ध्यान धरोनी राहिले ॥११॥

नामा म्हणे कोटी तीर्थांचें । तीर्थ वोळलें पैं साचें ।

पाप जाईल अनंत जन्मांचें । एक स्नान केलिया ॥१२॥३६||

## अभंग ३७ वा

मग अष्टदिशा व्यापुनी । तीर्थे राहिली स्थानीं स्थानीं ।

अलंकापुरीं पाटणीं । इंद्रायणीचां तटीं ॥१॥

धन्य धन्य सृष्टीतळीं । अलंकापुरीं महितळीं ।

कीर्तन करितां वैष्णवमेळीं । ते चतुर्भुज नर होती ॥२॥ध्रु.॥

मग पुंडलिकासी सांगितलें । कृष्णपक्षी येथे पाहिजे आलें ।

येरू म्हणे स्वामीने सांगितलें । ते शिरसा वंदीन ॥३॥

देव म्हणे आम्ही तुम्ही । पंढरीहुनि समागमीं ।

येवों अलंकापुरीं ग्रामी। सकळ भक्तांसहित ॥४॥

मग व्यास वाल्मिक बोलीविलें । त्यांसही हे तीर्थ सांगितलें ।

तिहीं शिवक्षेत्र ऐसें म्हणितलें । जुनाट असे केशवा ॥५॥

या शिवतीर्थाचा महिमा । कवणा वर्णवेल पुरुषोत्तमा ।

पंढरी पांडुरंग महात्मा । भीमातीर हें उत्तम ॥६॥

आणिक आइकें वो सर्वोत्तमा । येथे अधिक अष्टतीर्थे ग्रामा ।

पंचक्रोशीची उपमा । सिद्धि होती तात्काळ ॥७॥

ब्रह्मा विष्णु इंद्र तप । आणि योगेश्वर अमूप ।

पाताळीं शेष समीप । याजखालतां असे ॥८॥

स्कंदासी उपदेश स्थान । लोहोगिरीसी येथून ।

पुरुरवा पुण्यक्षेत्र महिमान । पूर्वी येथूनचि जालें ॥९॥

येथून भीमरथी नदी । भीमाशंकरा घेऊनि गेला नंदी ।

उगमी पडली सर्वां आदि । मग शंकरें स्नान केलें ॥१०॥

तें हें भीमा माहात्म्य प्रसिद्ध । तो हा सिद्धेश्वर अगाध ।

महायोगेश्वर निजबोध । अलंकापुरीं पाटणीं ॥११॥

ऐसें व्यास बोले तत्क्षणीं । नामा गेला लोटांगणीं ।

समाधी मूळपीठ स्थानीं । अलंकापुरीं ज्ञानदेव ।।१२।।३७||

## अभंग ३८ वा

मग व्यासपूजा सारिली । तैसीच वाल्मिकाची केली ।

वसिष्ठादिकीं अंगिकारिली । समस्त ऋषि पूजियले ॥१॥

धन्य धन्य धरातळीं । येऊनियां देवीं सकळी ।।

माजीं सहित वनमाळी । अलंकापुरीं नगरीये ॥२॥

मग साठी तीनशें गंगा । माजीं शिव द्वादश लिंगा ।

अष्टोत्तरशें तीर्थे समर्थ पैं गा । तिहीं तपन आरंभिलें ॥३॥

कोटी तीर्थांचा रहिवास । अष्टभैरव सावकाश ।

वसू कोटी गणेश । साठीसहस्र गणांसहित ॥४॥

ऐसे रहिवासले षण्मास । दिव्य द्रुमफळें प्रतिदिवस ।

दिव्य अन्ने सावकाश । अमृत भक्षिती देव ॥५॥

ऐसा सकळ तीर्थांचा मेळा । तयामाजी परब्रह्म पुतळा ।

करी ज्ञानदेवाचा सोहळा । अलंकापुरीं नगरिये ॥६॥

गरूड हनुमंता ऐसे । पुढें कामारी हृषिकेशें ।

साक्षात वसिजे महेशें । गौरीसहित अलंकापुरीं ।।७।।

नंदि भृंगी त्राहाटण । प्रतिदिनीं विभूतीचें उधळण ।

जयजय शंकर शिवपूर्ण । ऐसीं स्तोत्रे गाताती ॥८॥

महासभा स्थळ वैकुंठ । सभें श्रेष्ठ वैकुंठपीठ ।

आणि शिवमूर्ती घनदाट । नीळकंठ सभेसी ॥९॥

रंभा उर्वशी नाचती । नारद तुंबर वीणे वाती ।

गणेश सारजा आळविती । सहा राग एकवीस मूर्च्छना ॥१०॥

ऐसा रंग स्थिरावला । जयजयकारें घोष केला ।

तेणे चवकला उठिला । पाताळींचा शेष ॥११॥
ऐकोनी विष्णुकीर्तन । तयासी आले पैं स्फुंदन ।

मग उच्चारित रामकृष्ण । मृत्युलोकासि आला ॥१२॥

सहस्रवदन स्तुती करी । हरें नमस्कारिलें हरी ।

वाहुनि तुळसीमंजिरी । ज्ञानदेवा पूजिलें ॥१३॥

नामा म्हणे ज्ञानउदयो । ज्ञानदेवा भाग्याचा पाहा हो।

आपण येऊनि वैकुंठरावो । समाधि दिधली निजहस्तें ॥१४॥३८||

## अभंग ३९ वा

ऐसे स्वर्गवासी अमर । ते आपुलाले ठाई स्थिर ।

राहोनि करिती जयजयकार । पुष्पवृष्टी ज्ञानदेवावरीं ॥१॥

धन्य धन्य तूं विष्णुभक्ता । ज्ञानदेवा तूं समर्था ।

म्हणौनि पडती पुष्पचळथा । पांडुरंगावरी ॥२॥ध्रु.||

अनंत तीर्थांचा मेळ । उदकें शिंपिती ब्रह्मगोळ ।

लोहोगिरीं सुवर्णाचळ । त्यावरी अलंकापुरी ॥३॥

म्हणती धन्य धन्य हे जन । येथें जो करील कीर्तन ।

तया जोडे वैकुंठस्थान । चतुर्भुज होऊन जाईल ॥४॥

देव म्हणती इंद्रासी । तूं पूर्वी येथें होतासी।

आणि ब्रह्मा रूद्र तापसी । पूर्वापार हे पुरी असे ॥५॥

कृत त्रेत हे द्वापारा आधीं । येथे सकळांची समाधी ।

धन्य ज्ञानदेव गोविंदीं । रातोनी येथें बसले ॥६॥

इंद्र म्हणे विष्णुभक्त थोर । प्रत्यक्ष हे हरिहर ।

निवृत्ती सोपान ज्ञानेश्वर । हेहि अवतार हरीचे ॥७॥

ऐसें सांगितलें समस्तां । मग विदित जालें उभयतां ।

शक्र झाला निघतां । ब्रह्मा आदि करूनी ॥८॥

शेषही पाताळासी गेला । पुंडरिक गोपाळ राहिला |

अलंकापुरीं स्थिरावला । सकळैक भक्तांसहित ॥९॥

सवें संतांचा मेळ । ऐसा राहिला गोपाळ ।

नामा म्हणे चक्रचाळ । पुढें कैसें वर्तलें ॥१०॥

## अभंग ४० वा

गगनपंथें शुभ्र विमानें । देव लक्षिती अधोवदनें ।

तंव अलंकापुरीं कीर्तनें । टाळ मृदंग झणत्कारले ॥१॥

जयजयकार क्षितीं होत । महादोषां संहार घात ।

नामा असे नाचत । पांडुरंगापुढे ॥२॥

रामकृष्ण अवतार । चरित्रें गाती सविस्तर ।

वैष्णवीं केला जयजयकार । पांडुरंगे म्हणितलें ॥३॥

ज्ञानदेव बैसलें समाधी । पुढें अजानवृक्षनिधी ।

वामभागीं पिंपळ क्षितीं । सुवर्णाचा शोभत ॥४॥

निवृत्ती सोपान खेचर । ज्ञानदेव मुक्ताई निरंतर ।

हे उत्तरद्वारासमोर । बैसते जाले ॥५॥

देव म्हणे ज्ञानेश्वरा । चंद्रतारा सूर्य जंव दिनकरा ।

तुझी समाधि स्थिरा । राहो हे निरंतर ॥६॥

जंववरी हे क्षितिमंडळ । जंववरी हे समुद्रजळ ।

मग कल्पक्षयी यथाकाळ । माझा हृदयीं साठवें ॥७॥

आणिक एक सोपारें । ज्ञानदेव ही चार अक्षरें।

जो जप करील निर्धारें । त्यासी ज्ञान होईल ॥८॥

ऐसा दिधला आशीर्वाद । मग संतांसी बोले गोविंद ।

ज्ञानदेवा ऐसा उद्बोध । दुजा न देखो सृष्टीसी ॥९॥

नामा म्हणे स्वामी माझा । अंगिकार केला वोजा ।

पावला भक्तांचिया काजा । गरुडारूढ होवोनी ॥१०॥

## अभंग ४१ वा

ऐसे संतोषले देव । प्रसन्नरूपें माधव ।
मग बोलती ज्ञानदेव । विठ्ठलाप्रतीं ॥१॥

धन्य धन्य तूं विठ्ठला । धन्य प्रत्यक्ष देखिला ।
धन्य समारंभ येथिला । सोहळा करिसी भक्तांचा ॥२॥ध्रु.||

तुझेनि आम्ही धन्य । हें जगत्रयीं देवा मान्य ।
म्हणती भक्तांसमान । न देखों त्रिभुवनीं ॥३॥

तूं विश्वात्मा विश्वरूप । तूं जगाचे नांवरूप ।
तुज न लिंपे पुण्यपाप । सदा शुद्ध बुद्ध अससी ॥४॥

तो तूं आम्हां भक्तांसरिसा । सवें हिंडसी जगदीशा ।
तुजविण अष्टदिशा । मज शून्य वाटती ।।५॥

तरी तूं पाळिसी भक्तांचा लळा । समाधीचा केला सोहळा ।
तो दाखविला मज डोळा । दिव्य दृष्टी देवोनी ॥ ६॥

तूं सत्वरजतमात्मक । तूं सकळ जीवांचा चाळक ।
तूंचि त्रिमूर्ती अवघा सकळ । विराटस्वरूप सकळ ॥७।।

भक्त भाग्य भूमितळीं । याकारणें तूं वनमाळी ।
दहा अवतार भूमंडळी । नाना चरित्रें खेळसी ॥८॥

ऐसें महिमान अगाध । तें तुझें रूप प्रसिद्ध ।
कोण भाग्याचा मी प्रबुद्ध । तो तूं मजकारणें आलासी ।।९॥

नामा म्हणे ज्ञानदेवें । ऐसी स्तुती केली स्वभावें ।
तंव कृपा करूनियां देवे । अभयकर दीधला॥१०॥

## अभंग ४२ वा

चतुर्भुज श्याममूर्ति । शंखचक्रांची आकृती |

पीतांबराची दिव्य दीप्ति । पडिली सृष्टीवरी ॥१॥

धन्य धन्य ज्ञानदेव । धन्य धन्य तो माधव ।

मग आरंभिला अनुभव । ज्ञानदेवाचेनि मुखें ॥२॥ध्रु.||

देव म्हणे ज्ञानेश्वरा । तू अवतरोनि माजीं चराचरा ।

हरिला महादोषथारा । तुझेंनि कवित्वें ॥३॥

तुझें कवित्व माझ्या गोष्टी । जो परिसील हे सृष्टीं ।

तो येईल माझे भेटीं । वैकुंठपीठीं विष्णूच्या ॥४॥

तुवां जो ग्रंथ अनुभव । तें सांगितला भाव ।

तें मुख्य ठेवणें राणीव । अनुभवीच जाणती ।।५॥

तैसाची अमृतानुभव । सिद्धपीठीं केला भाव ।

दाऊनी मनोहर राणीव । निजगुह्य आमुचें ॥६॥

वसिष्ठगीतेची टीका । भावार्थ काढिला श्लोका ।
ग्रंथ रचिला नेटका । करूनि रचना दाविली ॥७॥

तूं महद्‌ब्रह्मींचा अंश । पदपदांतरी केला प्रवेश ।
दाऊनियां उदास विशेष । या जीवांसी तारिलें ॥८॥

सम तरी तूं आतां एक वेळ । माझी स्तुति करीं निर्मळ ।

जेणे करूनि तरती सकळ । वक्ते श्रोते ग्रंथकार ॥९॥

नामा म्हणे परमानंद | पावोनियां उद्‌बोध |

केला ज्ञानदेव सावध | स्तुती उपरती मांडिली ||१०||४२||

## अभंग ४३वा

ऐसें अलंकापुर पीठींचे । भक्त नांदती देवाचे ।

जे कां सागर भाग्याचे । ज्ञानउदयों प्रकाशितें॥१॥

मग षोडश उपचारी | पूजा ज्ञानदेवा आदरी |

दिव्य वाद्यें मंगळतुरी | ओंवाळिती पंचारतीया ||२|| ध्रु.||

ज्ञान सोपान निवृत्ति | मुक्ताई प्रत्यक्ष ज्योती |

ओंवाळिती विष्णुमूर्ती | चतुर्भुज पैं ||३||
पितांबरधारी शाममूर्ति | शंखचक्राची आकृति |
उद्धव अक्रूर ढाळिती | चवरे वरी ||४||

प्रत्यक्ष लक्ष्मी आपण | प्रसन्न सुप्रसन्न वदन |
माजीं मिरवें दिव्य सिंहासन | त्यावरीं आरुढली ||५||
पुढें गरुड जोडला करीं | उभा पक्षाचा फडत्कारीं |
सूर्य लोपे तेजाकारी | अमृत करुणामयंक ||६||

गोपाळ देव्हुडें उभे | मंजुळ पावे वेणु प्रभे |

शुभ काळ सुप्रभे- | माजीं स्तुती मांडिली ज्ञानदेवें ||७||

नामा म्हणे ऐका | पुढील ग्रंथाचीं पीठिकां |

तो तारिल सकळ लोकां | एक एक अक्षर ऐकतां ||८||४३||

## अभंग ४४वा

श्री नमन --

नमो काळ कौतुहाळ । नमो चक्रचालक गोपाळ ।

नमो विश्वप्रतिपाळ । प्रभंजना ॥१॥

नमो शिव शिवेशा । नमो शिवादि विश्वेशा ।

नमो रूपा अष्टदिशा । व्यापका नारायणा ॥२॥

नमो सकळ गर्भोद्भवा । नमो चित्तचाळक भावा ।

नमो विष्णुमूर्ती देवाधिदेवा । श्रीविठ्ठला ॥३॥

नमो भजनशीळ व्यापका । नमो ज्योतिर्लिंग दीपिका ।

नमो नमो तुज एका । आत्मव्यापका जगद्गुरु ॥४॥

नमो श्रिये श्रीनिवासा । नमो आगमपरेशा ।

नमो ज्ञानगम्याधीशा। प्रतिकुळा ॥५॥

नमो स्वलीला विनटा । नमोस्तु ते वैकुंठपीठा ।

नमो रूपादि श्रेष्ठा । वैकुंठीचिया ॥६॥

नमो दर्शन स्पर्शना । नमो उपरति निधाना |

नमो तितीक्षा दारूणा । कमळालया ॥७॥

नमो त्रिघंटी आदटा । नमो त्रिगुणा तूं उद्भटा ।

नमो सत्वरूप सदटा । ब्रह्मनामा ॥८॥

नमो राजेश्वर हरी । नमो विगळित संहारी ।

नमो वाचा वक्ता करी । वाचाळ वाक्पुष्पी ॥९॥

नमो तमहर्ता कर्ता । नमो सकळसंहर्ता ।

नमो काळ कौळुदाता । रक्षिता हरिभक्तां तुज नमो ॥१०॥

नमो हरहरेश्वरा । नमो न देखों दुसरा ।

नमो वेदान्त सागरा । सर्वेश्वरा तुज नमो ॥११॥

श्रुती निरामय नमो। नमो ज्ञानरूप गमो।

नमो द्वैतनिरसनसमो । करीं तूं निजकरें ॥१२॥

नमो व्यक्ताव्यक्त हरी । नमो मायासंहारकेसरी ।

नमो याचा माजी घरी । नांदसी तूं आत्मारामा ॥१३॥

जीवशिव नमो तुज । नमो सर्वजीवबीज |

नवल तूंचि सहज । गरुडध्वजा श्रीविठ्ठला ॥१४।।

केलें स्तवन आरंभ । नमो जगदादि अखिलस्तंभ ।

उभा राहोनी प्रतिबिंब । भीमातीरीं पंढरिये ॥१५॥

नमो ऐसिया रूपेशा । नमो त्रैलोक्यविस्तार ठसा ।

नमो आदि परेशा । जगदीशा युगादी ॥१६॥

नमो पुरुषोत्तम परेशा। नमो सकळही उदासा ।

करूनि जीवरूप ठसा । नांदसी तूं चराचरीं ॥१७॥

मधुसूदना तुज नमो । मधु माधवा हृदयीं रमो ।

नमो मधुरगीत नमो । माजीं घरीं आत्माचिया ॥१८॥

विविधतिमिरनाशा । परम परमानंदा उल्हासा ।

नमो पुरविसी आशा । हरिभक्तांची श्रीहरी ।।१९।।

नमो वासना चक्रचाळी । नमो तुंडवितुंड गेली ।

नमो सर्वही हारली । प्रपंचरचना ॥२०॥

नमो श्रीधर श्रीकर । नमो सर्वसंगी विकार ।

नमो विकृतीविकार | हरिसी नामें एकें ॥२१॥

नमो शांती दया क्षमा । नमो कृपा करी पुरुषोत्तमा ।

नमो कांसवदृष्टीसमा । निष्कलंक नाथा ॥२२॥

नमो द्विविधछेदका । नमो एकार्णव पावका ।

नमो द्वादश अर्का । शुभांशका वेदवक्त्या ॥२३॥

नमो चित्त चकोर हर्त्या । नमो सर्वकारणकार्ये कृत्या।

नमो तुजवांचोनि सत्या । विवेकप्रत्यया पैं नमो ॥२४॥

नमो अद्वैत अनंता । नमो निर्द्वंद्वद्व भोक्ता ।

नमो नित्यानित्य सरता । तुज नमो नमो ॥२५॥

नमो दुर्गतिहरणा । नमो सर्वहरण भरणा ।

नमो सर्वदृश्य निवारणा । भयहरणा जगदीशा ॥२६॥

नमो शिवशक्तिसमलिंगा। नमो भक्षक काळवेगा।

रुद्रादित्या वसु पैं गा । सम सर्वांगा परम परेशा ॥२७॥

नमो कृत्रिमदहना । नमो कृशकरणहरणा ।

नमो प्रतिपाळक राणा । नारायणा तुज नमो ॥२८॥

नमो इंद्रिये नियंत्या । नमो प्रपंच आकृत्या ।

नमो दीनादित्या । सकळ वृद्धि तूंचि ॥२९॥

नमो अवधूत दत्ता । नमो अपरमित मिता।

नमो सर्वांवरिष्ठ सत्ता । तूं चाळिता हृषिकेशी ॥३०॥

नमो दृष्टदर्पदर्पा । नमो चमत्कार नागसर्पा ।

नमो हरणशापा । नमो स्वल्पा रामकृष्णा ॥३१॥

नमो चतुर खेददीप्ता । नमो हरण तूं सुप्ता ।

जागृति स्वप्न गुप्ता । सत्यसुप्ता महाविष्णु ॥३२॥

नमो देवेश्वरा सूक्ता । महामोह महाहर्ता ।

मंद मंद नियंता । नमो नारायणा ।।३३।।

नमो क्षीर नीर निर्झरा । नमो विद्‌गद भानुकारा ।

नमो विवेक सागरा । महानंदा ॥३४॥

नमो मुखदंतसदना । नमो भक्षक भुवना ।

शुक्लांबरा शुक्लवर्णा । दयाघना गुणनिधी ॥३५॥

मृतामृत तुज नमो । नमो श्रुतिशास्त्रसमों ।

नमो हा गर्व गमो । पद्मगर्भानंतानंता ॥३६॥

नमो चिदाकाशव्याप्ता । चित्सत्ताचळणसत्ता ।

चित्स्वरूपादिरूपा । भुवनदीपा महामूर्ती ।।३७।।

नमो एकाएकार्णव । नमो कल्पादि गुणवैभवा ।

नमो सकळ हे दैव । हे भाव पैं तुझे ॥३८॥

गो गोपाळ नमो नमो । गोविंद गुणविष्णुधर्मो ।

नमो चित्तचिंतनी रमो । सर्वकाळ तुझ्या चरणीं ॥३९।।

ध्वज वजांकुशा । ध्वजनीळ विकासा ।

ध्वजांबरा अष्ट दिशा । नीळिमा भासती शामांकिता ॥४०॥

सुषुप्तीचे जन सत्य । नमो तुज कृत्य ।
असो सजे आमीत्य । तें ते क्षमा करी स्वामी ॥४१॥

नमो निर्धारनियता । नमो सुखरूप दाता ।

नमो आलिया पदार्था । क्षमा करीं स्वामी ॥४२॥

नमो चित्त विभ्रमा । नमो धार्य धैर्य नेमा ।
नमो पुराण पुरुषोत्तमा । पाहे कासवदृष्टीं ॥४३॥

पसायदाना नमो । परम परेशा समो।
ध्यानांतरगमो । तुझ्या चरणीं केशवा ॥४४॥
आग्रहनियंत्या नमो । सुग्रह परी नमो ।

आतां नित्य धर्मो । वैकुंठगुणग्राम नमो नमस्ते ॥४५॥

अनादृश्या दृश्यमाना । दृशादृश्य नित्यघना ।

सुखरूप जगज्जीवना । तुज नमो स्वामी ॥४६।।

दीप्तादीप्त अदृश्ये । जीवन दिसती त्यास सादृश्ये।

जीवमय हे भाष्ये । तुज नमो स्वामी ॥४७॥

परम परब्रह्मा । आदिब्रह्मा तूं रामा ।
भक्तांलागी साउमा । तुज नमो ॥४८॥

नमो नमो एक तत्वा । बाह्य मुद्रा शुद्ध सत्वा ।

योगा रूढ परतत्वा । सबाह्य पावसी तुज नमो ।। ४९॥
या वेदादि परम वक्ता । वेदादि तूंचि कर्ता ।
र तुजवांचोनि सर्व सत्ता । नमो भोक्ता न देखों ॥५०॥
ज्योतिर्मय रूप तुझें । सर्वतत्वां तूंचि बीज ।
नमो तुज सहज । पुढती पुढती नमो नमो ॥५१॥

परब्रह्म परात्पर । परमतत्व परमसार।
परमगुह्य परम विचार । तुज नमो नारायणा ॥५२॥

दीघड विघड सुघड । जडाजाड अवघड ।
द्वैताद्वैत जोडाजोड । कर्ता कार्यता तुज नमो ॥५३॥

संख्यारहित जीवना । असंख्य जीवपाळणा ।
नमो तुज संजीवना । पुंडलिकधना पांडुरंगा ॥५४॥

निर्गुण सगुणरूपा । देवादेव तूं सोपा ।

तुझी झालिया कृपा । नमन बापा तुझ्या चरणीं ॥५५॥

नमो नमो तारका । तूं ब्रह्म नामा विशेषा ।

नमो तुजवांचोनि सखा । योगीयासी पैं नाहीं ॥५६॥

जुगादि जुगत्रये । जुग जोग योगमय ।

हे तुज पासाव होय । ऐसिया तुज नमो ॥५७॥

नमो नमो नम । नाहीं नाहीं तुजसम ।

ऐसा परा पश्यंती नेम । वदलिया चारी ॥५८॥

या चहूं मुक्ति परतत्वा । पंचभूजा शुद्ध सत्वा।

षड्मार्ग गुण सत्वा । ग्रासन करिसी तुज नमो ॥५९॥

विद्गदचि विलासा । भानुबिंबाप्रति प्रकाशा ।
नमो तेजसतेजसा । आदिसूर्या ॥६०॥

ऐसा चहूं ग्रंथींचा क्लेशु । वाउगाचि वाहे सोसु ।।

तिमिर त्रिगुण असोसु । तो सत्वांशु तोडीं माझा ॥६१॥

साही नाडी चक्र भ्रमे । वाहातां इंद्रियांची ग्रामें ।

अडखळोनि साउमे । नये ऐसें करीं स्वामी ॥ ६२॥

बाध्ये बाधा कर्मांची । सर्व सत्ता या भ्रमाची ।

नमनें करूनियां तुमची । तुम्हासी अर्पिली स्वामी ।।६३॥

यमधर्मांची सत्ता । कर्म धर्माचिया पंथा।

कर्मधर्म विधाता । ऐसिया नेमिता तुज अर्पिला ॥ ६४ ॥

दम शम समान । इडा पिंगळा सुषुम्न ।

साही चक्र दरूषन । तुझीं तुज अर्पिलीं ॥६५॥

मन पवनयोग धारण । तूं यासी पैं कारण ।

समतुकें अवघें गुण । तुझ्या चरणीं निक्षेपिलें ॥६६॥

हें हें भूतभौतिक प्रचंड । जन्म उत्पत्तीचें अंड ।

जन्म जुगादि ब्रह्मांड । खंड विखंड तूं जाणता ॥६७॥

प्रचुर चर्या चित्ताची । धाव न वळत  अकृत्याची ।।

सूचना जे चमत्काराची । ते हि अर्पिन तुज सदां ॥६८॥

निर्वासना वासनायुक्त । गुंफले राहिले जेथें चित्त ।

तेथें तूं धावोनि अनंत । सोडविसी वासनामयें ।।६९॥

सूक्ष्म अविचार बोला । बोली न मिळे व्यर्थ गेला ।।

तो म्यां बुझावोनि संबोखिला । मग लाविला तुझ्या पंथीं ॥७०॥

नित्य धर्माचिया वोळी । चळल्या चुकल्या कोण चाळी ||

त्यासी वेद तुझा पाळी । त्या तूं सांभाळी परब्रह्म ॥७१॥

श्रुतिस्मृतींची वचनें । स्वर वर्ण उच्चारणें ||

याची अंगराग मार्गस्थानें । याही नारायणें अंगीकारावीं ॥७२॥

उदंड विदंड वितंड । देहद्वयाचे आभंड ।

जे जे दिसे अंड अंड । ते ते शुभ्र चंड सांभाळी ॥७३॥

देहभरणाची ममता । देह पोशिती जे सत्ता ।

त्याहि वरी सूक्ष्मता । ते कृपावंता सांभाळीं ।।७४॥
तिमिर त्रिगुण अवघे । जें जें आले वोघें ।

तैसे तें मी नेघें । तें तूं सकळ वेगें सांभाळीं ।।७५॥

योनींचिया कष्टा । वरी वासना होती भ्रष्टा ।

त्या त्या करूनि प्रविष्टा । रत झालों तुझ्या चरणीं ।।७६।।

विद्या वयसा कुळ । ब्रह्मकर्म आचारशीळ ।

गेले आले विव्हळ । ते तूं दयाळ सांभाळीं ॥७७॥

नाम नाना जन्म अवतार । नाना शाखांचे निर्धार ।

नाना गोत्र उच्चार । तुझा विचार तूं जाणसी ।।७८।।

पाठ वेदादि वचनें । शास्त्रदृष्टी अवलोकनें ।

कीर्तनीं गुण वर्णनें । तेहि नारायणें अंगीकारावी ॥७९॥
सर्वमय सर्व सपाट । त्यावरी करूनि चालिलों वाट ||

चंद्र सूर्य नक्षत्रें घनदाट । करूनि एकवाट पायरी ।।८०॥

सर्व अंडांचे ब्रह्मांड । मी न म्हणे अंडा अंड ।

खंडे करूनियां विखंड । प्रचंड मी तुजसी बोलें ॥८१॥

रोमरंध्रीं ब्रह्मांडें । सकळ विराटमय खंडें ।

ऐसी महाभूतें प्रचंडें । तुझ्या अंगी दातारा ।।८२॥

तूं विश्वरूपपटाची घडी । तारक ब्रह्मचि उघडी ।

माया निजदृष्टी न चोखडी । तुझी मूर्ति न्याहाळिली ।।८३॥

तें न सुटे निजकळे । येऱ्हवीं हें नाकळे ।

तुझ्या कृपागुणें आकळे । तुझिया दासा निजभक्तां ।।८४॥

अनंत या नामाचा संकेत । मन मुराले जेथें निर्धूत ।

तूंपणे परमाद्भुत । परमानंदा ॥८५।।

गुणाग्रगोसावी तूं राम । गुण समुद्र गुणग्राम ।

सकळ भूतांचा विश्राम । तुज नमो ।।८६॥

नमन केलिया विभूतीं । चित्त रमलें झाली विश्रांती ।

तुज देखिलिया श्रीपती । न राहे चित्तीची तळमळ ॥८७।।

नमन हेंचि थोर दिसे । एऱ्हवीं तरंगाकार भासे ।

देखिलें तितुकें नासे । नैश्वर्य ऐसें श्रुति बोले ॥८८॥

नमन हेंचि परम । नमन हेंचि सुवर्म ।

नमन हेंचि आत्माराम । करूनि घालीं ॥८९॥

नमन हाचि अनुभव । नमन हाचि मुख्य भाव ।।

नमन हाचि पैं देव । देवाधिदेव तूं पावसी ॥९०।।

नमन हेंचि श्रेष्ठ पीठा । नेतसे तुझिया वाटा ।

तुज ऐसा श्रेष्ठा । मग वाटा काय कराव्या ।।९१।।

नमन हेंचि तारक । नमन हाचि विवेक ।

नमनेंविण त्रैलोक्य । आडमार्गें रिघताती ॥९२।।

नमन लटिकें नव्हे नव्हे । नमन भलतियासी न साहे ।

जयें साह्य सखा होय । श्रीनिवृत्ती ।।९३।।

नमना एवढा मंत्र । नाहीं नाही धुंडितां शास्त्र ।

विचारिल क्षणमात्र । तोचि जाणे येथींचे ।।९४।।

नमन करी ब्रह्मा श्रेष्ठ । नाभीकमळी धरी वैकुंठ ।

नमन करी नीळकंठा । तीर्थें मस्तकीं वंदिता ।।९५।।

इंद्र चंद्र महेंद्र थोर । नमनेंविण नैश्वर ।

आंडामध्ये चराचरा । नमनेंविण न तरती ॥९६॥

श्रीगुरुकृपा जैं होय । तैं नमनाची ऐसी सोये ।

पावोनि सुगम उपाये । नमो नमस्ते तुज ॥९७॥

नमस्ते नमस्ते नमस्ते । पुढतीं पुढतीं नमस्ते ।

समाधिसुख हस्ते । नमो नमन करितां ॥९८॥

नमो आदिपीठा । शिवादिक वरिष्ठा ।

येथे येऊनि वैकुंठा । समाधि शेज घातली ॥९९॥

महाविष्णु तूं योगरूपा । महारूपाचिया स्वरूपा ।

महादित्या अमूपा । कोटी सूर्य तेजसा ।।१००।।

शंखचक्रानें मंडित । करकमळ तुझें मिरवत ।

पदक हृदयावरी शोभत । आणि श्रीवत्सलांछन ॥१०१।।

अनंत बाहूंचा मेळ । तो तूं चतुर्भुज गोपाळ ।

मुगुट विराजित तेजाळ । कोटी सूर्याहूनि प्रभा ॥१०२॥

पितांबर माळां कंठी । सर्वांगीं चंदनाची उटी ।

हिरे माणिकें कटीतटीं । अनेक कीळा फाकती ॥१०३।।

क्षुद्रघंटिकाचिया वोळी । घणघणाट तया तळीं ।

देहुडा पाऊलीं निश्चळीं । वेणु वाजविसी सुस्वरें ।।१०४॥

रुणुझुणु रुणुझुणु । ऐसा वाजविसी वेणु ।

सुंदर तूं श्यामतनु । अलंकापुरी उभा अससी ॥१०५॥

सभोंवते गोपाळ तुझे । ते अंतरंग सखे माझे ।

पुंडलिक तरि सहजें । प्राण सखा मैं माझा ।।१०६॥

ऐसा ज्ञानउद्बोध बोलें । ज्ञानांजन निरसलें ।

विज्ञानहि हरविलें । दृश्य द्रष्टेपणेसी ॥१०७।।

बापरखुमादेवीवरू । समाधि देऊनियां स्थिरू ।

वरी ठेवोनियां अभय करू । वर देऊनि राहिला ॥१०८॥

## अभंग ४५ वा

ऐसी स्तुति नमनाची । केली तया भगवंताची ।

ऐकतां झाली रुची । म्हणे धन्य धन्य रे ज्ञानेश्वरा ॥१॥

कैसी स्तुति परिकर । जपतां नामावळी साचार ।

वेगीं तुष्टले हरिहर । निज ब्रह्मस्वरूप ॥२॥ध्रु.||

वैष्णव सभोंवतें उभे । तिहीं जयजयकार प्रतिभें ।

करूनि रुक्मिणीवल्लभें । तयां प्रसाद दिधला ॥३॥

मागुतां ज्ञानदेव वदे | म्हणे धन्य धन्य तुझीं चरणारविन्दें |

जेथें रातलीं योगीवृन्दें | ते चरण धन्य धन्य ||४||

पुंडलिकें स्तवन | करावें तंव नारायण |

म्हणे सन्मुख उभा सोपान | त्यासी समाधि देणें लागेल ||५||

निवृत्ती मुक्ताई दोघे | ते बुझाविली पांडुरंगें |

उद्धव अक्रूर वेगें || तयांसंगें निरविली ||६||

ज्ञानदेवासी उद्धव | बोले एकांतींचा भाव |

तुम्हां तुष्टला देवाधिदेव | धन्य धन्य वैष्णव तुम्ही ||७||

ज्ञानदेव म्हणे स्वामी । दीन रंक विठोबाचे आम्ही ।

धन्य धन्य भाग्याचे तुम्ही । जे निरंतर विष्णुसंगें ॥८॥

उद्धव म्हणे ज्ञानेश्वरा । आम्ही जाणो कृष्णावतारा ।

परि पांडुरंग मूर्ति निर्धारा । तूं आणि पुंडलिक जाणसी ॥९॥

म्हणे ज्ञानदेवें । मागुतीं स्तवन आरंभिलें भावें ।

तें ऐकावया देवें । एकचित्त पैं केलें ॥१०॥४५||

## अभंग ४६ वा

कर जोडोनियां पुढें । लोटांगण टाकिलें गाढ़ें।

म्हणे स्तवन करावया मी वेडें । काय जाणें तुझा महिमा ॥१॥

तरी पांडुरंगा तूं दयाळु । भक्तभाविकां कृपाळु ।

भीमातटी उभा गोपाळु । पुंडलिकाकारणें ॥२॥

चंद्रभागा सरोवरीं। नीरे भिवरेचें तीरीं।

वाट पाहसी हरी । भक्तसाह्या कारणें ॥३॥

तरी उदार शूर महिमेचा । खुंटलिया चारी वाचा।

तेथ पवाडु मज कैंचा । वर्णावया सामर्थ्य ॥४॥

शेषा ऐसा स्तुती करी । तया नाकळसीच श्रीहरि ।

जिव्हा चिरलिया भग्नधारी । मग मौन्येचि राहिला ॥५॥

तो तूं अलंकापुरी येसी । मज दीना समाधि देसी ।

देव म्हणे तूं होसि । साक्षात ज्ञानरूप ॥६॥

ज्ञानदेव साक्षात नाम तुझें । तें ज्ञान हृदयीचें माझें ।

हे जन तारावया काजें । तुवां अवतार घेतला ॥७॥

नामा म्हणे देव हरि । पुढता पुढतीं सहाकारी।

वर देऊनि अधिकारी । आपणचि जाहला ॥८॥४६||

## अभंग ४७ वा

तंव अंतरिक्षी गगनीं । देव बैसोनि विमानीं ।

वरुषताती दिव्य सुमनीं । पांडुरंगावरीं ॥१॥

विठोबा गुणनिधी । सवें पुंडलिक सुबुद्धि ।

लघिमा आणिमादि सिद्धी । सवें असती ॥२॥ध्रु.॥

मग नेमिलियां तिथीं । अष्टमी कृष्णपक्ष समर्थी ।

कीर्तन केलिया यथार्थी । ब्रह्मलोक पाविजें ॥३॥

नवमीं गजर कथेचा । तरि वैष्णव तोचि साचा ।

चतुर्भुज होईल हे वाचां । वदोनियां गेले ॥४॥

सहज ते दशमीं । दिंडी जागरण आश्रमीं ।

तो येईल वैकुंठग्रामीं । कीर्तन करीताची ॥५॥

एकादशी श्रेष्ठ गाढी । नामस्मरणें कोटी याग जोडी ।

एक एक घडी युगाएवढी । एवढें सामर्थ्य इयेचें ॥६॥

एकादशी दिननिशीं । जागरणीं हृषिकेशीं ।

कीर्तन करितां अहर्निशीं । तरि तो तारिल सर्व जनां ॥७॥

द्वादशीं क्षीरापतीं । कीर्तन करीत आल्हादीं।

तो पावन होईल गोविंदीं । निजपदी विष्णूच्या ॥८॥

त्रयोदशीं उत्तम थोर । करील दिंडी पताका गजर ।

टाळ मृदुंग झणत्कार । तरी तो सकळ कुळ तारील ॥९॥

नामा म्हणे चतुर्दशीं । आमावास्येचा दिवशीं ।

ज्ञानदेवी राहेल नेमेंसी । तरी तो तरेल भूतळीं ॥१०॥४७॥

## अभंग ४८ वा

ऐसें वदोनि पांडुरंगें । समस्तांसी वस्त्रे दिव्य अंगें ।

देऊनि भूषणें अनेगें । रत्नमुक्ताफळें अलंकार ॥१॥

धन्य जन्मले महितळीं । कीर्तन करील हरिजवळीं ।

तो पावेल गोपाळीं । अलंकापुरीं बोलिले ॥२॥ध्रु.॥

सवें रुक्मिणी सत्यभामा । त्या पुसती पुरुषोत्तमा ।

थोर श्रेष्ठ येथील महिमा । भूमीवरी वैकुंठ ॥३॥

देव म्हणे जंववरीं हे धरा । तंववरीं हे समाधि स्थिरा ।

कीर्तन करील तो सैरा । चतुर्भुज होईल ॥४॥

हें शिवपीठ शिवाचें । आणि मूळस्थान अगस्तीचें ।

जन्म झाले स्वामीचे । तो हा पुण्यभूमि ठावों ॥५॥

पूर्वापार कल्पांतयुगीं । अनेक पुण्ये घडले यागीं ।

अनंत तपें तपलें योगी । तो हा अलंकापुरी ठावो ॥६॥

येथे रामकृष्ण कथा । जो करील सर्वथा ।

तो पुढें न पावेल व्यथा । भवबंधापासुनी सुटेल ॥७॥

सप्तद्वीप नवखंडें । आणि अनंत ब्रह्मांडें ।

त्याहूनि हे वो उदंडें । पुण्य जोडेल नामें ॥८॥

हे उत्तमोत्तम थोर । सकळ जीवांसीं माहेर ।

नाम घेतां तरेल चराचर । तो हा सुलभ ठावो रुक्मिणी ॥९॥

नामा म्हणे स्वमुखें देवो । बोलोनि वर्णिला हा ठावो ।

अलंकापुरी पाहा हो । प्रत्यक्ष वैकुंठरूपें ॥१०॥४८॥

## अभंग ४९ वा

नित्य अनुष्ठान ये तीर्थी । त्याचे पूर्वज उद्धरिती ।

जे कां अन्नदान करिती । ते पावती वैकुंठराज्यें ॥१॥

ऐसें तीर्थक्षेत्र उत्तमोत्तम । आणिक नाहीं यासी सम ।

शिवपीठ हे मनोरम । अलंकापुरीं हें देखा ॥२॥धृ.॥

न वर्णवे येथिंची थोरी । जेथें साक्षात श्रीहरि ।

येऊनियां झडकरी । ज्ञानदेवा समाधि दिधली ॥३॥

अनंत पुण्य जें गांठीं । तरीच ज्ञानदेव पडे दृष्टीं ।

हें अगाध पुण्य धुर्जटी। बोलोनियां गेले ॥४॥

सिद्ध साधकाचें स्थळ । सर्व तीर्थां हेंचि मूळ ।

वास केलिया नित्य काळ । तरि महादोष हरतील ॥५॥

अजानवृक्षाखालीं कथा । नित्य जोडे जरी सर्वथा ।

तो नर नवजाय यमपंथा । ऐसें जगन्नाचें वचन॥६॥

सुवर्णाचा अश्वत्थ । नित्य पूजलिया स्वस्थ ।

लक्ष्मी न सांडील त्यास । जन्म देईल पवित्र ॥७॥

नित्य प्रदक्षिणा सप्त । तरी अगाध पुण्य त्वरित ।

पूर्वज वैकुंठासी जात । बेचाळिसां सहित ॥८॥

नित्य ब्राह्मण भोजन । द्‌विजा देती जे कां अन्न ।

करुनिया संध्यास्नान । ते पवित्र निर्मळ होती ॥९॥

नामा म्हणे अलंकापुरी । धन्य धन्य मनोहर ।

पवित्रासीं परम परिकर । त्रिभुवनीं दुर्लभ ।।१०।।४९।।

## अभंग ५० वा

ऐसा तीर्थविध महिमा । सांगतां थोर असे सीमा ।

ब्रह्मा येतसे साउमा । विष्णुभक्तालागीं ॥१॥

न वर्णवें महातीर्थ । सिद्धेश्वरलिंग समर्थ ।

ज्ञानदेव तेथें नांदत | अलंकापुरीं सिद्धेश्वरीं ॥२॥

पुंडलिक म्हणे पूर्वील । हें शिवपीठ निर्मळ ।

येथें नीळकंठ दयाळ । तप करूनि गेले ।।३।

पंढरीहुनी हें अधिक । ऐसें बोलती ब्रह्मादिक ।

धन्य धन्य येथिचे लोक । ज्यासी स्नान संध्या घडत ।।४।।

देव म्हणें ऐकें भक्ता | महामहंत तूं सर्वथा |

आणिक हा विवेक वक्ता | ज्ञानदेव ||५||

तुम्ही दोघे इये सृष्टीं । जगत उद्धारावया परिपाठी ।

कीर्तन करितां वैकुंठी । सकळ भक्त येतील ॥६॥

पुंडलिकें नमस्कारिले हरि । चरणरज वंदिले शिरीं ।

म्हणे मी भाग्याचा तरी । तूं साहाकारी आमुचा ॥७॥

नामा म्हणे देवभक्त । एक होऊनि असे बोलत ।

तंव निवृत्ती स्तुती करीत । अगाध महाविष्णूची ॥८॥

## अभंग ५१ वा

परब्रह्म परममूर्ति । परमधर्म परात्परदीप्ति ।

परमप्रियो परंज्योती । स्वात्मा स्वयें ॥१॥

अकळ विकळ निरंजना । ज्ञाता ज्ञेय विवेकघना ।

संशयदृश्य निरसना । विश्वप्रियो ॥२॥ध्रु.||

नलिनी कमल विकाशा । नयनघन विश्वेशा ।

नमन चरणलेशा । चित्सुखा ।।३।।

चराचर चिदांग अंग । स्नान शिवनिर्व्यंग ।

विष्णुमूर्ति पांडुरंग । आकाररूपें भीमातटीं ॥४॥

सजळ जळदघना । सजळ निर्मळ वदना |

दशन कोटि सूर्यकिरणा । मुगुट विराजित ॥५॥

नीलोत्पल नीलवर्णा । श्यामसुंदरा मूर्तिघना ।

स्तवितां सहस्रवदना । न कळे पार तुझा ॥६॥

रजतमाचे मेहुडे । तुज पाहतां मज न संपडे ।

नाहीं तुझिने पाडें । भूमंडळीं दैवत ॥७॥

अनंत ब्रह्मांडाधीशा । गुण न वर्णवेती परेशा।

तुंवा ज्ञानदेवा ऐसा । अपणामाजीं साठविला ॥८॥

निवृत्ती म्हणे आम्ही दीनें । तारावी तुम्ही नारायणें ।

मग काय आदरिले सोपानें । तेथवरी येणे घडेल ॥९॥

ऐसी निवृत्तीची स्तुती । ऐकुनि श्रीपती ।

नामा म्हणे देव तयाप्रती । बोलते जाले ॥१०॥

नारायणें स्तुति परिसिली । ऐकोनियां अव्यक्त बोली ।

म्हणे तुवां गीतेची टीका केली । ते प्रमाण आम्हांसी ॥११॥

नामा म्हणे हरि देवें । जाणोनियां अंतरभाव ।

तुष्टले गुणगौरवें । निवृत्तीसी दिधलें ।।१२।।

## अभंग ५२ वा

देव म्हणती शिवाचा । तूं गा अवतार साचा ।

स्तुति करसिल वाचां । हेंचि नवल ॥१॥

सप्तद्वीप नवखंडें । आणि अनंत ब्रह्मांडें ।

रोमरंध्री ज्या अखंडें । तो मनुष्यरूपें मेदिनी ॥२॥ध्रु.॥

निवृत्ति म्हणे नाना अवतारीं । तुज सेवेंचि आम्ही हरी ।

जें जें प्रेरिसी कामारी । तुझें कर्तव्य करूं ।।३।।

देव म्हणे भलें आतां । सांगशी तें करूं सर्वथा ।

हरूं भवार्णवाची व्यथा । या त्रैलोक्याची ।।४।।

तंव निवृत्तीनें लोटांगण । म्हणे नाहीं तुज समान ।

आम्हांकारणे नारायण । तूं साहाकारी होसी ।।५।।

आमुचीं तपें सामर्थें । तुवां सिद्धी पावविलीं जगन्नाथें ।

सरतें करूनि आम्हांते । विष्णुमार्गी लाविलें ॥६॥

देव म्हणे तूं आदि । विष्णुमार्गीची सकळ सिद्धी ।

जाणतां एकत्र त्रिशुद्धी । निवृत्ती होसी ॥७॥

नामा म्हणे ऐसे लळे । पाळीले तयाचे गोपाळें ।

देऊनियां समाधी सोहळे । विष्णुधर्म प्रतिष्ठिला ॥८॥५२॥

## अभंग ५३ वा

ऐसा निवृत्ती स्थिरावला । महाविष्णु संतोषला ।

मग सोपानदेवें आरंभिला । स्तुतिवाद परियेसा ।।१।।

जयजय रामकृष्णा । भक्तभावी हरी तृष्णा ।

देहीं दीपक सहिष्णा । रामकृष्ण म्हणतांचि ॥२॥

नरहरि नरकेसरी । टाळी वाजवूनियां गजरी ।

टाळ मृदंग झणत्कारी । जयजय कृष्ण म्हणों आम्हीं ॥३॥

हरिविण नाहीं सखा । त्रिभुवनीं आम्हांसी देखा।

समाधिसुखविशेषा । चरणरजें डौरवावें ॥४॥

धन्य हे भूमिका देश । आपणही जगन्निवास ।

ज्ञानदेवें केला वास । समाधिसुख घेउनी ॥५॥

निवृत्ती ऐसा श्रेष्ठ गुरू । होईल समाधीसी होय स्थिरू ।

पुढे काय करणें विचारू । तो सांगा स्वामिया ॥६॥

देव म्हणे ब्रह्मावतारा । या अवघिया चराचरा ।।

श्रेष्ठ तूंचि निर्धारा । मनुष्यरूपें अवतरलासी ॥७॥

सकळ हें तुझे व्यापक । चराचर हें त्रैलोक्य ।

अधर्म झालियां चाळक । अवतार घेती तिघे ॥८॥

ऐसें बोले पांडुरंग । तंव  सोपान सर्व निःसंग ।

म्हणे सांकडे फेडितां श्रीरंग । तूंचि श्रीविठ्ठला ॥९॥

नामा म्हणे सोपानदेवें । मागुती स्तुति आरंभिली भावें ।

जेणे करूनियां बरवें । समाधि सेजेची ॥१०॥५३॥

## अभंग ५४ वा

मुक्ताई म्हणे देवाधिदेवा । तूं विसावा सर्वां जीवशिवा ।

गुण गौरव अनुभवा । आम्ही जाणों तुज ॥१॥

सत्य सत्य जनार्दन । सत्य सत्य नारायण ।

सत्य सत्य तूं आमुचे धन । जगज्जीवन जगदाकार ॥२॥

तुजवांचोनि त्रिभुवनीं । दुजा न देखों नायकों कानी ।

वेदशास्त्रपुराणीं । अगाध महिमा तुझा ॥३॥

तूं देवा देवोत्तम । योगियांचा विश्राम ।

शिवाचा ही आत्माराम । ऐसा नेम वेदाचा ।।४।।

तरी भक्तालागीं ऐसा । पावसी तूं हृषिकेशा।

तुजविण नाहीं भरंवसा । ऐसा निश्चयो साचा ।।५।।

तूं परत्रिचे तारूं । तुझा आगमनिगम विचारू ।

तुज चिंतिलियां संसारू । निरसे हेंचि सत्य ।।६।।

देव म्हणे मुक्ताई । चित्त समरसें जें माझ्या ठायीं ।

तया जन्मचि नाहीं । हे सत्य जाणावें ॥७॥

नान नामा म्हणे ऐसी स्तुती । मुक्ताई जंव करिती।

तंव संत विनविती । महाविष्णूसी ॥८॥५४॥

## अभंग ५५ वा

तंव पुंडलिक पुढारला । कर जोडोनि वदला ।

म्हणे वेदादिकां अबोला । तुझिया रूपाचा ॥१॥

तो तूं प्रकट श्रीरंगा । भीमातटी पांडुरंगा ।

येऊनि आमुचिया लोभा । भक्तजनां तारिसी ॥२॥ध्रु.॥

नेणों कोण भक्तपण । नेणों तुमचें महिमान ।

कोण तप कोण साधन । कोणें जन्मीं केलें होतें ॥३॥

नीरे भिवरे संगमीं । चंद्रभागेच्या उगमीं ।

वेणुनाद परब्रह्मीं । गोपाळ गजरें गर्जती ॥४॥

तरी स्वामी दीनदयाळा । महाविष्णू तूं गोपाळा ।

भक्तांलागीं कृपाळा । तारावया दासासी ॥५॥

माझें करूनियां मिस । राहिलास युगें अठ्ठावीस ।

करूनियां रहीवास । माझे भक्ति लाधलासी ॥६॥

तूं नियंता ईश्वरमूर्ति । सकळ गोसावी श्रीपती ।

तुजवांचोनी नेणें मती । दयामूर्ति परब्रह्मा ॥७॥

नामा म्हणे पुंडलिकें । स्तवन केलें ऐसें ।

तंव म्हणीतलें पुण्यश्लोकें । पुरे पुरे रे आतां ॥८॥५५॥

## अभंग ५६ वा

पुरें करुनियां स्तवन । मग सारुनियां स्नान ।

पंग्ती आदरिलीं आपोषणें । भोजनें करिताती ॥१॥

धन्य धन्य ज्ञानराजा । तूं आवडलासि केशिराजा ।

पंग्ती करुनियां द्विजा । वाढितसे रुक्मिणी ॥२॥धृ.॥

राही रुक्मिणी सत्यभामा । पंचामृतें वाढिती उत्तमा ।

पुंडलिक बोलावुनि साउमा । ज्ञानदेवा पंग्ती बसविलें ।।३।।

निवृत्ती सोपान मुक्ताबाई । गोपाळ देव्हुढे दोन्ही बाहीं ।

रुक्मिणी सत्यभामा राही । वाढिती अन्ने नानाविधं ॥४॥

वैष्णव प्रेमळाचे पंग्ती । प्रार्थना करिती श्रीपति ।।

ज्ञानदेव निवृत्ती । एकवट बैसले ॥५॥

गरुड तिष्ठत होता द्वारीं । त्यासी रुक्मिणी ताट करी ।

मग गर्जिन्नले जयजयकारी । श्रीराम गोविंद उच्चारीं ॥६॥

देव आकाशीं पाहती । ब्रह्मादिक वंचलों म्हणती ।

भाग्य केवढे यांचे क्षितीं। या भक्तजनांचें ॥७॥

नामा म्हणे अलंकापुर । धन्य धन्य मनोहर ।

आपण येउनि शारंगधर । समाधि देती ज्ञानदेवा ॥८॥५६॥

## अभंग ५७ वा

तंव विनवी ज्ञानदेव । देवाचा जाणोनियां भाव ।

म्हणे विष्णुभक्त सदैव । सुख सर्वदा भोगिती ॥१॥

बैसोनियां आसनीं । भक्त देव चक्रपाणि ।

तांबुल घेवोनि वदनीं । सुखसंतोषें बोलती ॥२॥धृ.||

मग पाचारिला गरुड । आणि पुंडलिक भक्त प्रौढ ।

सोपान गम्य गूढ । जाणते भक्त ॥३॥

प्रयाणासि मुहूर्त । पंढरीस जावयाचें आर्त ।

संवत्सरा जाऊनि त्वरित । समाधी देऊ सोपाना ।।४।।

ऐसा निर्धार करूनि । समस्तां भोजनें सारूनि ।

सिद्ध झाली रुक्मिणी । तंव दिन अस्तमाना गेला ।।५।।

मग तया पुष्पक मंचकावरी । शयन आरंभिलें हरि ।

नारद तुंबर वैकुंठांभीतरी । वेणु वाजविती सुस्वरें ॥६।।

भक्त भागवत भाग्याचे । तीहीं जयजयकार केले वाचें ।

ऐसें चतुर प्रहर निशींचे । हरिजागरणें क्रमिलें ॥७॥

नामा म्हणे निघतां हरि । ज्ञानदेव प्रार्थना करी ।

देवा तूंचि वैकुंठहहरि । आमचा हृदयस्थु ॥८॥५७॥

## अभंग ५८ वा

उगवला दिन प्रभात । स्नानसंध्या सारीत ।

तंव उद्धव विनवीत । श्रीविठ्ठलासी ॥१॥

बहू भाग्य बहू सीमा । काय यासी पुरुषोत्तमा ।

आतां चला वेगीं आश्रमां | पंढरीप्रती ।।२॥

गरूड उभा तिष्ठत । भक्त भागवत समस्त ।

मग पुंडलिकें एकचित्त । साष्टांग नमस्कारिले हरि ॥३॥

म्हणे ज्ञानदेव यजुर्वेदी । वाग्स्नेहो वाग्बुद्धी ।

परा पश्यंती वैखरी समाधी । त्या मंत्रोक्त दिधली ॥४॥

ऐसाचि सोपान मार्ग । तूं ही करितां पांडुरंग ।
मग ग्रामलेखनाचा प्रसंग । निरोपिला कुळयाती ॥५॥

म्हणे वंशपरंपरा । न सांडावे गा आचारा ।

आम्ही जातसों पंढरपुरा । राया विठोबा सांगातें ॥६॥

मग गरुडावरीं वळघले | समस्तीं जयजयकार केलें |

ज्ञानदेवें हरिपाऊलें। दृढ धरिलीं निरंतर ॥७॥

नामा नाचे हरीचें द्वारीं । ऐसा स्वानंद अलंकापुरीं ।

विठ्ठल निघाले पंढरी । ज्ञानदेवा समाधि देवोनि ॥८॥५८॥

## अभंग ५९ वा

मग उड्डाण केलें गरुडें । गगन आक्रमिलें चंडें ।

वरी आरुढले प्रचंडें । देवभक्त सकळिक ॥१॥

ज्ञानदेवावरी अभयें | सोपान झाला निर्भय |

तैसाचि निवृत्तीस उदयें | समाधि देईल हरि ||२||ध्रु.||

पक्षाचेनि फडत्कारें । ग्राम ठाकिलें संवत्सरें ।

गिरी कऱ्हे कडे पठारें । शिखरीं गरुड उतरला ॥३॥

ते दिनीं समारंभ केला । महा उत्सवो हरिसी झाला ।

जयजयकार प्रवर्तला । विमानीं दाटले आकाश ॥४॥

पाहावया कवतुक । आले देव सकळिक ।

काय करील ब्रह्मांडनायक ।  कवतुक अवलोकिती ॥५॥

पुंडलिक उतरला । सर्वे संतांचा मेळा ।

समाधि लक्षण डोळां । पाहती देव सकळिक ।।६।।

मग खणोनियां  भूमिका । अमृतें शिंपिली देखा ।

महामंगळिक सुखा । वेदघोष आरंभिले ।।७॥

नामा म्हणे सुखसंगतीं । वैष्णव हरिनाम गर्जती ।

लक्ष्मीनारायण क्षितीं । उतरोनि समाधि देताती ॥८॥५९॥

## अभंग ६० वा

सर्व तीर्थोदक हरि | सर्व नेम अंगीकारी |

होऊनी साहाकारी | समाधि देती सोपाना ||१||

मग प्रत्यक्ष सरिता | अंगा गोमती माता |

यमुना भागीरथी तत्वतां | आलिया सरस्वती ||२||ध्रु.||

ब्रह्मा इंद्र तेहेतीस कोडी | नवही नाथ सवंगडी |

संत सनकादिक गाढी | वेदघोष आरंभिले ||३||

दिव्य सुमनें देवांगना | माजीं वरुषती गगना |

निवृत्ती लागतसे चरणां | रुक्मादेवी विठोबाच्या ||४||

पुष्पकारूढ देव | मागुती आले सर्व |

पांडुरंग म्हणे सदैव | सोपानदेव ||५||

इंद्रकीळ पर्वत आहे | तेथुनि वाट जावया पाहें |

पाताळविवरीं देहें | शेष फणीचे वसे ||६||

तयासी श्रुत करावें | ऐसें गरुडासी सांगितलें देवें |

येरु निघाला लघुलाघवें | सप्त पाताळें क्रमित ||७||

नामा म्हणे अमृतकरीं | कुर्वाळुनी अभ्यंतरीं |

सोपानदेव आपणाशेजारीं | सन्मुख बैसविला ||८||६०||

## अभंग ६१ वा

ऐसा सोपानासी तुष्टला । महा उत्सव हरिसी केला ।

अभयकर ठेविला । माथयांवरीं ॥१॥

म्हणे तूतें मी न विसंबे । संवत्सरी असेन स्वयंभे ।

वटेश्वरीं प्रतिभें । प्रतिवर्षी भेटी देईन ॥२॥ध्रु.॥

सिद्धसाधकाचे स्थळ । तो हा वटेश्वर प्रतिमूळ ।

यासी म्हणती सोज्वळ | नीळकंठ प्रथम नाम ॥३॥

पूर्वी हे ब्रह्मयाचे स्थान । येथें तप केलें गहन ।

महादेव  येऊनि आपण । यासी प्रसन्न झाले ॥४॥

इंद्रकिळ पर्वतरूप । यासी प्रत्यक्ष नारायणस्वरूप ।

कौंडिण्यपुरीं निक्षेप । योगिनीमाता प्रत्यक्ष ॥५॥

आनंदभैरव पूर्वें । क्षेत्रपाळ मल्लनाथ नावें ।

ब्रह्मा इंद्र देव विष्णवें । नांदोनियां गेले ॥६॥

अनंत ऋषींचीं शतें | महातीर्थें व्रत दैवतें |

ब्रह्मा झाला निर्मितें | तें हें स्थळ रे सोपाना ||७||

नामा म्हणे जनार्दन । बहुत संतोषला सोपान ।

प्रत्यक्ष परब्रह्म सनातन । उपदेश करी भक्तांसी ॥८॥६१॥

## अभंग ६२ वा

सोपान म्हणे देवोत्तमा । पूर्वी येथें होता ब्रह्मा ।

आणि तुम्ही पुरुषोत्तमा रामा । कोणे स्थळी होतेती ॥१॥

देव म्हणे कथा परिस । आम्ही होतों पंढरीस ।

कोट्यानुकोटी युगांस । अनंत कल्पें गेलीं ॥२॥धृ.॥

अनंत भक्तांचिया वोळीं । आणि वैष्णव भूमंडळीं ।

माजी गिवसले मेळीं । येणें पुंडलिकें ॥३॥

भक्ताचेनि आराधनें । साधिलें येणें पेणें ।

मज झालेसें येणें । या पुंडलिकाचिये भक्तीं ||४||

पूर्वापार पंढरीसी । होती विष्णुमात ऐशी ।

हें जाणोनि अहर्निशी । थोर अनुष्ठान मांडिलें ||५||

येणें प्रसन्न केलें हरा । हरें मज दाखविले निर्धारा ।

आपण राहोनि पाठमोरा । विश्व तारिलें कीर्तनें ॥६॥

येथूनि पूर्वभागें पंढरी । पश्चिमें ब्रह्मा शंकर निर्धारी ।

अवतार कऱ्हे पाठारीं । मानदेशीं महादेव ॥७॥

तेहतीस कोटी देवस्थळीं । पश्चिमें पूर्व बैसका मंडळीं ।

तप तपीन्नले चंद्रमौळी । इये इंद्रनीळ पर्वतीं ॥८॥

द्रोणाचळ चंद्राचळ । हनुमंतें आणिला विशाळ ।

त्याच्या शाखा अधोमूळ । तो हा पर्वत इंद्रनीळ ॥९॥

येथे वल्ली सुवर्णाकार । गुप्त असती त्या निर्धार ।

रात्री समई त्या दिप्ताकार । जनासी दिसती ॥१०॥

याचेनि दक्षिणद्वारा । गोकर्ण महाबळेश्वरा ।

पाताळद्वारा पूजा ईश्वरां । बेल निघती अद्यापी ॥११॥

नामा म्हणे ऐसीं देवें । सांगितलीं उत्तम लिंगें शिवें ।

जेथें वसिजे महादेवें । तें सांगिजेल पुढें ॥१२॥६२॥

## अभंग ६३ वा

ऐसी कथा सविस्तरी । देवें सांगितली पुढारी ।

मग शेषाद्रि पर्वतशिखरीं । गरुडासी उभें केलें ॥१॥

धन्य धन्य तो सोपान । धन्य धन्य समाधि धन ।

प्रत्यक्ष येऊनि नारायण । समाधि देती सोपाना ॥२॥ध्रु ॥

अनंत वैष्णवांचा मेळ । दिंडी पताकांचा रोळ ।

रामकृष्ण नामें कल्लोळ । ब्रह्मानंद करिताती ॥३॥

तंव उतरली विमानें । देव वरुषती सुमनें ।

ब्रह्मा इंद्र आनंदे तेणें । डुल्लत बैसले ॥४॥

संत सनकादिक ऋषि | सिद्ध साधक अहर्निशी |

महाभक्त तापसी | एकवटले ||५||

समाधिस्नानाचा आनंद । ऐकोनिया गोविंद ।

कथा सांगितसे भेद । तें ऐको बैसले ॥६॥

म्हणे सोपान धन्य धन्य । वेदपुरुष तूं संपन्न ।।

येथें मिळोनियां ऋषिजन । वेदघोष करिताती ॥७॥

नामा म्हणे प्रत्यक्ष देव । येउनी सिद्ध केलें सर्व ।

काय वर्णूं ते गुणगौरव । हरि करीं सोपानाचे ॥८॥६३॥

## अभंग ६४ वा

सोपान समाधी बैसला । सकळ देवीं पुष्पवरुषाव केला।

जयजयकारें भूगोल कोंदला । वैष्णव गर्जती नामघोषें ॥१॥

धन्य धन्य तो सोपान । स्वमुखें वर्णी श्रीभगवान ।

क्षणक्षणा करी स्तवन । उॠषिमुनि जन स्तवितात‍ी ॥२॥ध्रु.॥

नारद तुंबर उद्धव । पुंडलिक आदि करूनि सर्व ।

गण गंधर्व मुनिपुंगव । स्तविती सोपानातें ।।३॥

म्हणती केव्हडे भाग्य या दोघांचें । जें निधान ब्रह्मादिकांचें ।

जे ध्येय शंकराचें । निजात्मसुख जीवनकळा ॥४॥

तो स्वयें श्रीभगवंत । याची परिचर्या करित ।

भक्ता साह्य श्रीअनंत । तो अभिमान सिद्धी नेला ॥५॥

निजभक्तांचें कोडकौतुक । करू जाणे ब्रह्मांडनायक ।

तया वंदिती इंद्रादिक । वरकडाचा तो पाड किती ॥६॥

पुंडलिक उद्धव विस्मयो करिती । हे दोघे भाग्याचे त्रिजगती ।

याचेंनि नामें जग उद्धरती । सुख पोहे घातली ॥७॥

नामा म्हणे सकळ जनाचा । उदयो झाला दैवाचा ।

सुकाळ झाला स्वानंदाचा । स्मरणें या दोघांचेंनि ॥८॥६४॥

## अभंग ६५ वा

नामयाचा धरूनि हात । क्षणक्षणा पंढरिनाथ ।

ज्ञानदेवातें आठवित । कंठ सद्गदित करूनियां ॥१॥

उद्धवातें म्हणे पांडुरंग । या सज्जनाचा न व्हावा वियोग ।

हृदय होत दोन भाग । जाणा अंतरंग तुम्ही माझें ॥२॥ध्रु.॥

त्याविण गोड मज न वाटे । ऐसें जीवलग कैचे भेटे ।

जें मनींचा वियोग दुःख तुटे । समाधान वाटे हृदयामाजीं ॥३॥

ज्ञानदेवा ऐसा निधान । नाहीं धुंडितां त्रिभुवन ।

न सांपडे न देखो जाण । तुझी आण उद्धवा ।।४।।

धन्य धन्य हे तिघेजण । मुक्ताई मुक्तरूपें पूर्ण ।

ईहीं उद्धरिलें त्रिभुवन । भवदुःख दारुण नाशिलें ॥५॥

याचेनि पडीपाडें । उपमेसी दिसे थोडें ।

परि ज्ञानदेवा ऐसें रत्न जोडे । हें न घडे कल्पांतीं ॥६॥

माझे जिवींचें गुह्यगुज । हे उद्धवा सांगितलें तुज ।

कां नामदेव जाणे सहज । आणि सकळ संत सज्जन ॥७॥

ऐसें सांगे रुक्मिणीपासीं । घडोघडी हृषिकेशीं ।

तंव रुक्मिणीही निज मानसीं । या जीवलागासी आठवी ॥८॥

संतभक्त सकळ मिळोनि । मस्तक ठेविला श्रीचरणीं ।।

तंव बोले रुक्मिणी । तुम्हापासुनि दुरी नाहीत ॥९॥

निवृत्ति तुम्हां नाहीं भिन्नता । त्याचा आत्मा तुम्ही हो अनंता ।<br>शिव विष्णु ऐक्यता । असे स्वभावता मुळीच ॥ १०॥

ज्ञानदेव तरी तुमचाचि अंश । केवळ परब्रह्म स्वयंप्रकाश ।
स्वात्मसुख निज रहिवास । पूर्णस्वानंद उद्बोध ॥११॥

गोडी आणि गुळ | पुष्प आणि परिमळ |

रत्न आणि कीळ | भेद कैंचा स्वामी ||१२||

सोपान तरि पोटींचा । तो प्राण असे तुमचा ।

तेथें शब्द भिन्नपणाचा । कोठे मिरवेल स्वामी ॥१३॥

नामयाने धरूनि चरण । साष्टांगी करूनि नमन ।

म्हणे तूं सर्वांचे स्वानंद जीवन । मी दीन काय बोलों ॥१४॥६५॥

## अभंग ६६ वा

भगवंत म्हणे नामयासी । हें यथार्थ तूं बोलसी ।

परि क्षणक्षणा गुण आठवती मानसीं । या ज्ञानदेवाचे ॥१॥

भक्त ज्ञानी आणि वैरागी । ज्ञानदेवा ऐसा चहूंयुगी ।

न देखों नायकों याची लागीं । खंती वाटे बहुत ॥२॥

उद्धवें चरणावरी ठेऊनि माथा । कांहीं एक विनंति जगन्नाथा ।

हें सांगावें जी कृपावंता । गुज अंतरीचें स्वामी ॥३॥

निवृत्ति ज्ञान सोपानासी । हे बैसविले समाधीसीं ।

मुक्ताईची स्थिती कैसी । हें हृषिकेशी सांगावें ॥४॥

मग देव म्हणे तूं काय नेणसी । परि प्रीतीने आम्हां पुससी ।

तरी ऐक गा तिथिये स्थितीसी । उघडचि बोलों ॥५॥

तरी नाथाचा हात इचिये शिरी । यालागी हे सत्य सनातन अवधारीं ।

महाकल्पाचिया अवसरीं । सोडील देह ।।६।।

तंववरी इचे शरीर । अभंग चिरकाळ निरंतर ।

महद्माया योगिणी साचार । मुक्ताई उद्धवा ।।७।।

मग सकाळ देव बैसोनि विमाना । गेले आपुलें निजभुवना ।

ऋषि मुनि गण गंधर्व सकळही जाणा । हरिसी नमुनि चालिले ॥८॥

म्हणती ज्ञानदेवाच्या प्रसादें । देखिली विठ्ठलचरणारविंदें ।

रूप पाहातां डोळियां दोंदें । निघति स्वानंदें सुखाची ।।९।।

म्हणती पाहा हो भाग्याचे केव्हडे | जें कैवल्य ब्रह्म उघडें |

ऐसे संवत्सर ग्रामीं वाडेंकोडें | देखिलें सकळिकीं ||१०||

तरी ज्ञानदेव हा पायाळ जाण । निवृत्तिदेव तोचि अंजन ।

सोपान तो नयन । तेथील सुखप्राप्ती ॥११॥

ऐसें करोनि साधन । साधिलें श्रीविठ्ठल निधान ।

तेथींचे विभागीं ज्याचें भाग्य पूर्ण । तीही प्रत्यक्ष देखिलें ॥१२।।

या निधानासी कुरवंडी । मुक्ताई देहभावचि सांडी ।

मग उभविली गुढी । आनंदाची सर्वकाळ ।।१३॥

नामा म्हणे पंढरीसी । चालिले हृषिकेशी ।

भक्तांचि मांदी देवासरिसी । नामघोष गर्जत चालिले ।।१४।।६६॥

## अभंग ६७ वा

ऐसें यांचे चरित्र जो आवडी ऐकें । तो या भक्तांबरोबरी तुके ।

भोगी वैकुंठींची निजसुखें । हें बोलिले स्वमुखें श्रीविठ्ठल ॥१॥

धन्य धन्य ते भक्त । ज्याकारणें श्रीभगवंत ।

ऐसे पवाडे करित । विश्व उद्धरीत तेणें करूनि ॥२॥ध्रु.॥

जे भाग्याचे होती । त्यांसीच होय हे प्राप्ती ।

ते मागुती न येति | पुनरावृत्ती गर्भवासा ।।३।।

नामा म्हणे नामस्मरणें । तुटतीं अनंत जन्मांची बंधनें ।

पाविजे सुख निदानें । पद साक्षात श्रीविठ्ठलचरणाचें ॥४॥६७॥

|| भजन - ज्ञानेश्वर माऊली ज्ञानराज माऊली तुकाराम ||

टीप - यानंतर पहिला अभंगाचे वाचन करावे.

## अभंग १ ला

ज्ञानदेव म्हणे विठ्ठलासी | समाधान तूंचि होसी |

परि समाधी हे तुजपासीं | घेईन देवा ||१||

न लगे मज भुक्ति | न लगे मज मुक्ति |

तुझ्या चरणीं आर्ती | थोर आथी ||२||ध्रु.||

विठोजी म्हणे ज्ञानदेवा | ज्ञानसागरा अनुभवा |

वचनेंचि विसांवा | झाला मज ||३||

ऐकें ज्ञानचक्रवर्ती | तूं तंव ज्ञानाचीच मूर्ति |

परि पुससी जे आर्ती | ते कळली मज ||४||

येक येक अनुभव कृपा | पदपदांतरें केला सोपा |

तरी त्यांत माझी कृपा | सकळही वोळली ||५||

ज्ञानदेवें चरणीं मिठी | मनेसीं पडली येकी गांठीं |

दृश्यादृश्य झाली एकदृष्टी | प्रत्यक्ष भेटी विठ्ठलेंसी ||६||

कर ठेऊनी कुरवाळीं | सर्वांग न्याहार न्याहाळी |

म्हणे तुवां घेतली जे आळी | ते सिद्धीतें पावेल ||७||

नामा उभा असे सन्मुख | ऐकतां थोर खेद दुःख |

म्हणे ज्ञानांजन महासुख | समाधि घेतसे ||८||१||

---

# परिशिष्ट

## १. आरत्या व उपसंहार

### १. प्रेम सप्रेम आरती

प्रेम सप्रेम आरती | गोविंदातें ओंवाळिती ||१||

धन्य धन्य तें लोचन | नित्य करिती अवलोकन ||२||ध्रु.||

बाळा प्रौढा आणि मुग्धा | ओंवाळितां परमानंदा ||३||

नामा म्हणे केशवातें | देखूनि राहिलों तटस्थें ||४||

### २. युगें अठ्ठावीस विटेवरी उभा

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगी रखुमाई दिसे दिव्य शोभा ।

पुंडलिका भेटी परब्रह्म आलें गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥१॥

जयदेव जयदेव जय पांडुरंगा । रखुमाई वल्लभा राहीच्या वल्लभा पावें

तुळसीमाळा गळां कर ठेवून कटीं । कासे पीतांबर कस्तुरि लल्लाटी ।

देव सुरवर नित्य येती भेटी । गरुड हनुमंत पुढे उभे राहती ॥२॥

आषाढीं कार्तिकी भक्त जन येती । चंद्रभागेमाजी स्नाने जे करिती ।

दर्शन हेळामात्रे तयां होय मुक्ति । केशवासी नामदेव भावें ओवाळिती ॥३॥

### ३. जयदेव जयदेव जय ज्ञानदेवा

इंद्रायणीचे तटीं धरिला रहिवास । विश्व तारावया लक्ष्मीनिवास ।

ज्ञानेश्वररूपें धरिले निजवेष । वर्म जाणे तया सद्गुरु उपदेश ॥१॥

जयदेव जयदेव जय ज्ञानदेवा । जीवाशिवाचा आदि परब्रह्म ठेवा ॥ध्रु.॥

कृष्ण एकादशी कार्तिकमासीं । आपण पंढरिनाथ सनकादिकांसी ।

यात्रेसी येताती स्वानंदराशी । दर्शन घडे तया निजमुक्ती देसी ॥२॥

म्हैसिक पुत्र केला वाचक वेदाचा । प्रतिष्ठानी गर्व हरिला विप्रांचा ।

विशेष अर्थ केला भगवद्गीतेचा । प्रत्यक्ष द्वारी शोभे पिंपळ कनकाचा ।।३।।
सनकसिद्धगणांमाजीं तूं श्रेष्ठ । ज्ञानावरी माजीं ज्ञानवरिष्ठ ।
अनुताप दीप्ति विश्व घनदाट । नामयावरी लोटे प्रेमाचा लोट ॥४॥

### ४. आरती ज्ञानराजा

आरती ज्ञानराजा | महाकैवल्यतेजा |

सेविती साधुसंत | मनु वेधला माझा ||१||

आरती ज्ञानराजा ||ध्रु.||

लोपलें ज्ञान जगीं | हित नेणती कोणी |

अवतार पांडुरंग | नांव ठेविलें ज्ञानी ||२||

प्रगट गुह्य बोले | विश्व ब्रह्मचि केलें |

रामा जनार्दनीं | पायीं टकचि ठेलें ||३||

### ५. जयजयाजी भक्तराया जीवलगा नामया

जन्मतां पांडुरंगें जिव्हेवरी लिहिलें |

शतकोटी प्रमाण हें कवित्व रचिलें ||१||

जयजयाजी भक्तराया जीवलगा नामया |

आरती ओंवाळितां चित्त पालटें काया ||२||ध्रु.||

घ्यावया भक्तिसुख पांडुरंग अवतार |

करोनियां तीर्थ मिसें केला जगाचा उद्धार ||३||

प्रत्यक्ष हे वाळवंट परीस केलें |

हरपली विषमता द्वैतबुद्धी निरसली ||४||

समाधि महाद्वारीं श्रीविठ्ठलचरणीं |

आरती ओंवाळितों परिसा कर जोडोनि ||५||

### ६. घालीन लोटांगण वंदीन चरण

घालीन लोटांगण वंदीन चरण ।

डोळ्यांनी पाहिन रूप तुझें ॥१॥

प्रेमें आलिंगीन अनंत पूजीन ।

भावें ओवाळीन म्हणे नामा ॥२॥

||विठ्ठल रखुमाई विठोबा रखुमाई ||

### ७. आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा

आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा |

माझिया सकळां हरीच्या दासा ||१||

कल्पनेची बाधा न हो कवणें काळीं |

संतमंडळीं सुखी असो||२||ध्रु.||

अहंकाराचा वारा न लागो राजसां |

माझिया विष्णुदासां भाविकांसी ||३||

नामा म्हणे तया असावें कल्याण |

ज्यामुखीं निधान पांडुरंग ||४||

### ८. मागणें तें एक तुजप्रती आहे

मागणें तें एक तुजप्रती आहे |

देशी तरी पाहें पांडुरंगा ||१||

या संतांसी निरवीं हेंचि मज देई |

आणिक दुजें कांहीं न मागें तुज ||२||ध्रु.||

तुका म्हणे आतां उदार तूं होईं |

मज ठेवीं पायीं संतांचिया ||३||

||ज्ञानदेव तुकाराम ज्ञानदेव तुकाराम ज्ञानदेव तुकाराम ||

|| तुकाराम तुकाराम तुकाराम ||

|| पुंडलिक वरदा हरि विठ्ठल श्री ज्ञानदेव तुकाराम ||

## २. संत नामदेवस्तवः ।

भक्तरत्नं संतवर्यं भक्तिमार्गप्रबोधकम् ।

विठ्ठलाङ्घ्रिरतं वन्दे नामदेवं पुनः पुनः ॥१॥

पंढरीक्षेत्रमाहात्म्यं येन लोके प्रचारितम् ।

कीर्तनाद्यगुरुं वन्दे नामदेवं पुनः पुनः ॥२॥

अभंगरचना यस्य भक्तिरसपरिप्लुता ।

पीयूषेण समादिव्या नामदेवं नमामि तम् ॥३॥

तत्त्वज्ञानैकनिष्ठोऽपि भक्तिप्रेम्णातु शैशवम् ।

स्वीकृतं येन वात्स्यल्यात् नामदेवं नमामि तम् ॥४॥

कीर्तने नृत्यमालम्ब्य ज्ञानदीपं प्रकाशितः ।

येन ज्ञानेश्वरसखं नामदेवं नमामि तम् ॥५॥

प्रल्हादोऽभूत कृते यस्तु त्रेतायां अंगदस्मृतः ।

द्वापरे चोद्धवःसाक्षात् नामदेवं नमामि तम् ॥६॥

योगादपि वरिष्ठं तं नामदेवं नमाम्यहम् ॥७॥

यो वै पंचनदप्रान्ते विठ्ठलख्यातिमुक्तवान् ।

धर्मे संरक्षिता लोका नामदेवं नमामि तम् ॥८॥

याचे त्वां परमोदारं दामेश जनवस्सल ।

वरदानंदहृदये ज्ञान भक्तिं विवर्धय ॥९॥

- स्वामी वरदानंद भारती

----------------

